कडे बोट करतो.) ह्यानेंच सर्व वर्तमानपत्रांना युद्धाबद्दल किंवा इटलीच्या स्वातंत्र्याबद्दल अवाक्षरहि न काढण्याचा हुकूम काढला! गेलीं सतरा वर्षें युद्ध-विषयक महत्त्वाचीं तिन्ही खातीं, सर्वाधिकारी महाशय, तुम्हीं आपल्याकडे ठेवलीं आणि त्याचा परिणाम काय झाला? लष्कराचा आत्मविश्वास धुळीला मिळाला, राजसत्ता दडपली गेली आणि आमचे हक्क पायांखालीं तुडविले गेले!! ह्या सर्व गोष्टींना तुम्हीं एकटे जबाबदार आहां. [बोलतां बोलतां ग्रांडीचा आवाज चढत जातो. त्याच्या प्रत्येक आरोपाबरोबर मुसोलिनी जास्त जास्त पांढराफटक पडत जातो.] तुमच्या भाषणांतील कांहीं वचनें इटलीच्या रस्त्यारस्त्यावरच्या भिंतींवर लिहिलीं जावीं अशी आज्ञा तुम्हीं केली आहे. हीं सर्व वचनें तुमच्या मूर्खपणाची साक्ष देतील इतकीं अर्थशून्य आहेत. पण त्यांपैकीं १९२४ सालीं उच्चारलेलें एकच वाक्य आज लक्षांत घेण्यासारखें आहे. त्याचें नीट मनन करा. "सगळ्या गटबाजीचा नायनाट होवो! देशाच्या जन्म-मरणाचा प्रश्न असेल तर आपला गटहि नाहींसा होवो!" तो क्षण आज आला आहे. आज आपला गट नामशेष झाला पाहिजे.

[ह्या धीरगंभीर इषाऱ्यानें सगळीकडे भीषण शांतता पसरते. प्रत्येकजण औत्सुक्यपूर्ण, भीतियुक्त नजरेनें मुसोलिनीकडे पाहतो. पूर्वी अनेक वेळां घडल्याप्रमाणें आपले काळे डगलेवाले आंत बोलावून मुसोलिनी ग्रांडीचा कांटा काढतो कीं काय अशी अनेकांना भीति वाटते. पण तसें कांहींच होत नाहीं.]

**मुसोलिनी** [भयानें पांढरा फटक पडतो. खुर्चीवर असहायतेनें मागें रेलून जणूं आपल्याला उष्णता असह्य होत आहे असें दाखवून गळ्याजवळील बटणें सोडतो व पुटपुटतो.]:--दुर्दैवानें वेळ साधलेली दिसते!

**पॉल व्हेरेली**:--सद्गृहस्थहो, कृपा करून माझें भाषण ऐकून घ्या. माझ्यावर फार गंभीर आरोप अगदीं ग्राम्य भाषेंत करण्यांत आले आहेत! मीं वृत्तपत्रांवर नियंत्रणें घातलीं त्यांच्या पाठीमागची भूमिका--[सर्वजण एकमेकांशीं बोलून आपल्या मनावर पडलेला काउंट ग्रांडीच्या भाषणाचा ताण घालविण्याचा प्रयत्न करतात. त्यामुळें पॉल व्हेरेलीच्या आत्मसमर्थनाकडे कोणाचें लक्षच जात नाहीं.]

**काउंट सिआनो** [मुसोलिनीचा जांवई, माजी परराष्ट्रमंत्री]:--युद्ध शेवटपर्यंत लढविणें हा प्रश्न वादातीत आहे असें माझें मत आहे. आपण आपलीं वचनें व आश्वासनें पार पाडण्यास बांधले गेलों असल्याचें अध्यक्षांनीं सांगितलें म्हणून मी आपल्याला इटली-जर्मनीच्या मित्रत्वाची पूर्वपीठिका सांगतों:--

हा तह घडून यावा म्हणून जर्मनीनें दोन वेळां विनंति केली. प्रथम १९३८ सालीं नेपल्सच्या आरमारी पाहणीच्या वेळीं. त्या वेळेस अध्यक्षांनीं उत्तर देण्याचें नाकारून उडवाउडवीचीं उत्तरें दिलीं. दुसरा प्रयत्न १९३९ सालीं केला गेला. ह्या वेळेस मात्र जर्मनीला युद्धापासून परावृत्त करण्यासाठीं अध्यक्षांनीं संमति दिली. हिटलरनें युद्ध निर्माण होईल असा कोणताहि प्रश्न उपस्थित न करण्याची हमी घेतली. पण ह्याच वेळेस जर्मन लष्करी अधिकाऱ्यांनीं पोलंडच्या मोहिमेची तारीख ठरवली होती.

हाच प्रकार पुनः पुनः घडला. साल्झबर्ग येथें झालेल्या माझ्या आणि हिटलरच्या भेटीची मी आपणांस आठवण करून देतों. ह्या भेटींत आपल्या अध्यक्षांनीं एक पत्र हिटलरला दिलें होतें. त्यांत इटलीच्या लष्करी सामर्थ्याचें वास्तविक वर्णन करून १९४३पर्यंत युद्धांत न पडण्याची हिटलरला विनंति केलेली होती. अशा प्रकारें [मुसोलिनीकडे वळून] तुम्हीं हिटलरपासून कांहींहि लपवून ठेवलें नाहीं; पण त्यानें मात्र तुम्हांला तितक्या नेकीनें वागविलें नाहीं. दिलेल्या वचनांना आणि लेखी करारांना हरताळ फांसून जर्मनांनीं ठरलेल्या वेळेच्या अगोदर युद्ध सुरू केलें. युद्धांत आपल्याला त्यांनीं खेळण्यापलीकडे मुळींच महत्त्व दिलें नाहीं. पोलंड-नंतरचें प्रत्येक आक्रमण तें सुरू झाल्यावरच आपणांस कळविण्यांत आलें. बेल्जिअमवरील हल्ल्याच्या बाबतींत तर मी जर्मन परराष्ट्रीय वकील मॅकेन्सेन ह्यांच्या निकट सहवासांत असतांना सुद्धां पहांटे चार वाजेपर्यंत मला कांहींहि कळूं शकलें नाहीं! तोंपर्यंत जर्मन फौजांनीं बेल्जिअमची सरहद्द ओलांडली होती.








रशियावरील मोहिमेस सुरुवात झाल्याची बातमी सुद्धां मला बिस्मार्ककडूनच कळली.

तेव्हां आपण ह्या प्रकरणांत दगलबाज ठरत नाहीं. जर्मनीनें आपला विश्वासघात केला आहे हें उघड आहे.

**फारिनाची**( जर्मनांचा कैवारी )--शूर जर्मनांवर केलेले हे आरोप म्हणजे आपल्या कृतघ्नपणाची साक्षच होत. जर्मनांनीं आपला कोणताहि विश्वासघात केलेला नाहीं. मोहिमेची बातमी आधीं न कळविण्याला लष्करी डावपेंच हें कारण होतें. एकदां पुढें केलेला मैत्रीचा हात जर्मनांनीं कधींहि मागें घेतलेला नाहीं. म्हणून मी काउंट ग्रांडीच्या ठरावामध्यें पुढील दुरुस्ती सुचवितोंः— 'इटॅलियन राष्ट्र जर्मनीकडे मित्र ह्या नात्यानें पाहत असून जर्मनीच्या साह्याची अपेक्षा करीत आहे' बादशहांना राजकीय सत्ता न देतां केवळ लष्करी सत्ता द्यावी असेंहि मी सुचवतों.

[ पुनः गंभीर शांतता पसरते. आतां वास्तविक आपली आत्मसमर्थनपर बाजू पुढें मांडण्याची मुसोलिनीची पाळी ! ]

**मुसोलिनी**( अगदीं हलक्या आवाजानें ):— आतांपर्यंत माझ्यावर अनेक आरोप केले गेले. त्या सर्वांना मी उत्तरें देऊं इच्छीत नाहीं. [ परंतु हें वाक्य पूर्वींच्याच अरेरावींत उच्चारण्याचा त्याचा प्रयत्न मात्र सिद्धीस जात नाहीं. त्या अरेरावीच्या जागीं आरोपीची लीनता येऊं पाहत आहे ] ही सर्व टीका निष्फळ आहे. तीन बलाढ्य राष्ट्रांच्या संघटित शक्तीविरुद्ध आपण लढत असतां मला शिव्याशाप देण्यानें आपण काय साधणार ?...

[ ह्या वाक्याचे वेळीं त्याचा आवाज अगदीं खोल जाऊन त्यांत कारुण्याची छटा स्पष्ट दिसत आहे. ]

**द मारिस्को**[ मुसोलिनी पुढें बोलत नाहीं असें पाहून ]:—माझा काउंट ग्रांडीच्या ठरावाला पाठिंबा आहे. घटनात्मक राजसत्तेचें पुनरुज्जीवन केवळ शाब्दिक स्वरूपांत न करतां खरेंखुरें करावें असें माझें मत आहे. आपल्याला जर कांहीं सदसद्विवेकबुद्धि असेल तर आपण ह्या सुलतानशाहीचा शेवट केला पाहिजे.

**स्कोर्झा**[ मुसोलिनीच्या चेहऱ्यावरील विकलतेचे भाव पाहून ह्या अप्रिय वादविवादाला बगल देण्याचा प्रयत्न करीत ] मला वाटतें आतां उशीर फार झाला आहे. तेव्हां उद्यांपर्यंत चर्चा स्थगित करावी.

**मुसोलिनी**:--[ घाईनें व एका कठिण प्रसंगांतून पार पडण्यास थोडा वेळ मिळाला तर बरेंच असा विचार करून ]:--मलाहि तसेंच वाटतें. [अत्यंत वेदना होत आहेत अशा तऱ्हेनें चेहरा वेडावांकडा करून ] डॉक्टरांनीं मला जास्त श्रम न करण्याची ताकीद दिली आहे. [ बऱ्याच जणांच्या तोंडावरील अविश्वासाचा स्पष्ट भाव ओळखून त्वेषानें ] डॉक्टरांनीं जर माझी काळजी घेतली नाहीं तर असले निष्फळ वादविवाद तुमच्याशीं करण्यासाठीं मला आयुष्यच उरणार नाहीं.

**काउंट ग्रांडी**( ताडकन् उभा राहून ):— चर्चा लांबणीवर टाकण्याला माझा तीव्र विरोध आहे. आतांपर्यंत अनेक वेळां तुम्हीं ह्याच्यापेक्षां अगदीं क्षुल्लक अशा प्रश्नांसाठीं आम्हांला रात्र रात्र जागविलें आहे ! आजचा प्रश्न सर्वांत महत्त्वाचा आहे. देशाचें भवितव्य आजच्या निर्णयावर अवलंबून आहे. चर्चा पुढें चालू झाली पाहिजे.

[ अगदीं दमूनभागून, असहायतेनें मुसोलिनी हातानें संमति देतो. चर्चा पुनः चालू होते. ]

**फेडेरझोनी**:—अध्यक्षांनीं 'कोणतेंच युद्ध पहिल्यानें लोकप्रिय नसतें' हें विधान कोणत्या आधारावर केलें हें समजत नाहीं. हें युद्ध मात्र लोकप्रिय नाहीं; कारण त्याला फॅसिस्ट युद्ध हें दळभद्रें नांव मिळालें आहे आणि त्यामुळें देशांत दुफळी माजली आहे ! पण लिबियाचें युद्ध आणि १९१५-१८चें महायुद्ध हीं लोकप्रिय नव्हतीं असें कोण म्हणेल ?

[ इतक्यांत बाराचे ठोके पडतात. थोडा वेळ बैठक स्थगित करण्यांत येते. मुसोलिनी स्कोर्झाबरोबर आपल्या कचेरींत जातो. कौन्सिलचे इतर सभासद लहान लहान समुदाय करून एकमेकांशीं जोरजोरानें चर्चा करूं लागतात. ग्रांडी आपल्या ठरावाच्या अनुकूल मताच्या सभासदांच्या सह्या गोळा करूं लागतो. लेमनचीं ग्लासें व सँडविचच्या बश्या प्रत्येकापुढें ठेवण्यांत येतात. बारा वाजून ३९








मिनिटांनीं मुसोलिनी व स्कोर्झा बैठकीच्या खोलींत प्रवेश करतात. मुसोलिनीचा चेहरा उतरलेला आहे. ]

**बास्टिआनिनी**( उपपरराष्ट्रमंत्री ):—मी आपणाला इटलीच्या गृहपरिस्थितींतील अनवस्थेची कल्पना देणार आहे. सिसिलीच्या नागरिकांनीं आयत्या वेळेस अवसानघात केल्यानेंच सिसिलीचा पाडाव झाला. नागरिकांना...

**मुसोलिनी**( त्याला मध्येंच थांबवून ):—सिसिलीच्या प्रश्नाचें मीं आधींच भविष्य करून त्याप्रमाणें उपाययोजनाहि केली होती. तेथील पोलिसांना जास्त अधिकार देऊन रस्त्यांत भटकणाऱ्या कोणालाहि अटक करण्याचा आणि बॉम्बवर्षावांत जो आपली जागा सोडील त्याला गोळी घालण्याचा हुकूम मीं दिला होता.

**बास्टिआनिनीः**—( त्याच्याकडे लक्ष न देतां ) नागरी जनता आणि पक्ष ह्यांमध्यें मोठा खंदक तयार झाला आहे. जनता राजसत्तेला अडथळे करण्यासाठीं सविनय प्रतिकाराचें धोरण अवलंबीत आहे. फॅसिझममध्यें बदल करण्याचा विचार करण्यास, मला वाटतें, आपण फारच उशिरां जागे झालों आहों! साल्झबर्ग–मुलाखतीच्या वेळीं दिलेला सल्ला मी पुनः एकवार आपणांस देतों. पूर्वयुरोपमधील राष्ट्रांशीं मित्रत्वाचे संबंध न जोडण्यांत आपण फार मोठी चूक केली आहे. त्यांनाहि आपल्याप्रमाणेंच नाझी वर्चस्व नकोसें झालें आहे. मला वाटतें अजून वेळ गेलेली नाहीं.

**गालबिआटी**( फॅसिस्ट लष्कराचा प्रमुख ):—मी काउंट ग्रांडीच्या ठरावाला विरोध करतों. सर्व इटॅलिअन् जनता इल् ड्यूचे सॅनॉर मुसोलिनी, आपल्या कौन्सिलचे मान्यवर अध्यक्ष, यांच्याच मागें आहे. देशांत दुफळी असेल तर ( बोटाई, ग्रांडी व बास्टिआनिनी यांजकडे वळून ) त्याला तुम्हीच जबाबदार आहां. मन तयार असेल तर शस्त्रास्त्रांचा तुटवडा युद्धाच्या आड कधींच येणार नाहीं.

[ गालबिआटीला कासानोव्हा—स्पेशल फॅसिस्ट ट्रायब्यूनलचा अध्यक्ष व बिगिनी—राष्ट्रीय–शिक्षण–मंत्री ह्यांनीं थोडक्यांत भाषण करून पाठिंबा दिला. ह्या अनुकूल भाषणांनीं मुसोलिनी स्वतःला थोडा सांवरतो. ]

**मुसोलिनी** ( काउंट ग्रांडीपासून सुरुवात करून, एकेका प्रतिस्पर्ध्याला उत्तरें देतो ):—तुम्हीं फॅसिस्ट राजवटीविरुद्ध आरोप केले आणि हे सर्व इटॅलिअन् जनतेच्या तोंडीं आहेत असें मला भासवलें. परंतु एका आरोपाचा मात्र उच्चार करण्याचें तुम्हीं टाळलें. ( एकेक शब्द जोर देऊन सावकाश उच्चारीत ) तुमच्यांपैकीं पुष्कळजण गडगंज संपत्ति मिळवून गब्बर झाले आहेत, असें जनता म्हणते. [ रागानें लाल होऊन हाताच्या मुठीनें समोरील टेबलावर प्रहार करून, धमकावणीच्या सुरांत ] तुम्हां सर्वांना फांसावर लटकविण्यास पुरे पडेल इतका पुरावा माझ्याजवळ आहे—[ सिआनोकडे बोट दाखवून ] याच्या पापाचा घडा तर भरलेलाच आहे. हा तर देशद्रोहाचा चालता बोलता पुतळा आहे ! ( कांहींसा शांत होऊन ) आतां मी काउंट ग्रांडीच्या ठरावाकडे वळतों. ह्या ठरावानें वैयक्तिक प्रतिष्ठेचे फार गंभीर प्रश्न उपस्थित होत आहेत. बादशहांनीं लष्कराचे सर्वाधिकारी होण्यास मान्यता दिली तर मला पदच्युत व्हावें लागेल. जास्त बोलण्याचा हा प्रसंग नव्हे. मला आज साठ वर्षें पुरीं झालीं आहेत. माझें प्रत्येक पाऊल मी पूर्ण विचारांतीं टाकीत आहें. प्रत्येक गोष्टीचा परिणाम काय होईल ह्याची मला चांगली जाणीव आहे. पण माझ्या ठराव मांडणाऱ्या मित्रांना मात्र आपल्या कृत्याची जाणीव आहे असें दिसत नाहीं. लक्षांत ठेवा ! उद्यां बादशहांनीं माझ्यावर पुनः विश्वास टाकला—आणि ते तो टाकतीलच—तर तुमची स्थिति काय होईल ? तुम्ही बादशहांना, पक्षाला आणि विशेषतः मला कोणत्या तऱ्हेनें तोंड देऊं शकाल ? ह्या गोष्टीचा नीट विचार करा. शिवाय युद्धपरिस्थिति सुधारून आजच्या अडचणींतून तावडतोब मार्ग काढतां येईल अशीहि एक योजना माझ्याजवळ आहे; पण ती मी फोडूं इच्छीत नाहीं.

**काउंट ग्रांडीः**—अध्यक्ष आम्हांला बनवूं पाहत आहेत. आपली त्यांच्याबद्दलची जुनी निष्ठा आणि आपली देशभक्ति ह्या दोन फांशांच्या साह्यानें जुगारी डाव टाकण्याचा त्यांचा बेत आहे. पण सद्-








गृहस्थहो, एका क्षणाचाहि विचार करण्याचें कारण नाहीं. देशाचें हित पहिल्यानें पाहिलें पाहिजे-- [ सगळीकडे खळबळ माजते. औत्सुक्याची परमावधि होऊन प्रत्येकाच्या मनांतील खळबळीचें प्रतिबिंब त्याच्या चेहऱ्यावर दिसूं लागतें. ]

**स्कोर्झा**( मुसोलिनीकडे वळून ):--तुम्हांला सर्वाधिकारी कसें व्हावें तें समजलेलेंच नाहीं. तुमच्या आज्ञा कोणी पाळीत नाहीं. आज पक्षाला शिस्तीची अत्यंत आवश्यकता आहे. आपल्या पक्षानें देशाला अत्यंत आणीबाणीच्या वेळीं मार्गदर्शन केलें आहे. पक्षाच्या थोर नेत्याचा अपमान करणाऱ्या देशद्रोह्यांना शासन झालेंच पाहिजे म्हणून काउंट ग्रांडी ह्यांचा ठराव फेंटाळावा अशी मी सूचना मांडतों. पक्षाचा चिटणीस ह्या नात्यानें, ह्या ठरावाविरुद्ध आपण मत द्यावें......

[ सगळीकडे खळबळ माजते. शिव्याशाप व अपमानकारक वैयक्तिक उल्लेख यांना ऊत येतो ! ]

**बास्टिआनिनीः**--पक्षाचा चिटणीस ह्या नात्यानें तुम्ही ठराव कां मांडतां ? तुमच्या बाजूनें मतें दिलीं नाहींत तर आम्हीं देशद्रोही ठरावें म्हणून कीं काय ? ही शुद्ध फसवणूक आहे !

**काउंट सिआनो**( ओरडून ):--आम्हां सर्वां-पेक्षां फोर्टे बॉचिआला जाण्याला तुम्हींच लायक आहां ! ( फोर्टे बॉचिआ ही फांशी देण्याची जागा होती. )

[ गडबड व गोंधळ यांची परमावधि होते. शांतता प्रस्थापित झाल्यावर द बोनो उभा राहतो. ]

**द बोनो**:--आजच्या आपत्तीला तोंड देण्यास लष्करच समर्थ आहे. देशाच्या इतिहासांत अत्यंत आणीबाणीच्या प्रसंगीं लष्करानेंच देशाला वांचविलें आहे. गेल्या महायुद्धांतील आपल्या लष्कराच्या पराक्रमानेंच आपल्याला जगांत मानाचें स्थान प्राप्त झालें. आपल्या देशाची उज्ज्वल परंपरा टिकविण्याचें लष्कर हेंच एकमेव साधन आहे. तेव्हां लष्कराच्या ताब्यांत सर्व सत्ता देणेंच इष्ट आहे.

**द स्टिफानी** ( अर्थमंत्री ):--सत्ताधारी व जनता ह्यांची फारकत झाली आहे ही गोष्ट लक्षांत घेणें जरूर आहे. प्रस्तुतचा महत्त्वाचा निर्णय जनताच करूं शकेल. केवळ पक्ष-संघटनेनें हें युद्ध जिंकणें अशक्य आहे. आज जनतेला युद्धाचें जोखड-जूं संभाळणें असह्य झालें आहे. डोळ्यांदेखत आपल्या घरांदारांची, कारखान्यांची, ऐतिहासिक वैभवाच्या अवशेषांची राखरांगोळी झालेली जनतेला दिसत आहे. काय वाटेल तें झालें तरी जें कांहीं वांचवतां येईल तें आपणांला वांचवलेंच पाहिजे.

**फारिनाचीः**--म्हणून माझ्या ठरावाला पाठिंबा द्यावा असें मी सुचवितों. जर्मनीची मदत व बादशहांना लष्करी सर्वाधिकार ह्या दोनच मार्गांनीं आपण पुढील घोर आपत्तींपासून स्वतःचें रक्षण करूं शकूं.

**सुआर्डो** ( फॅसिस्ट सेनेटचा अध्यक्ष ):--मी काउंट ग्रांडीच्या ठरावावर केलेली सही परत घेतों. [ त्याच्या डोळ्यांत अश्रू उभे राहतात ! ] सिनॉर स्कोर्झा ह्यांच्या ठरावाला पाठिंबा द्यावा असें मी सुचवतों-- [ त्याचा कंठ सद्गदित होऊन तो खालीं बसतो. ]

**चिॲनेटीः**--कांहींहि म्हटलें तरी अध्यक्षांनीं जनतेची पूर्वी केलेली सेवा व आतांच्या चर्चेचा त्यांच्यावर पडलेला ताण हीं लक्षांत घेऊन काउंट ग्रांडी यांनीं ठराव मागें घ्यावा असें मी सुचवितों.

**बोटाईः**--मीं या विषयावर दोन दिवस विचार केला आहे. दोन दिवसांत मी जेवलों नाहीं आणि मीं झोंपहि घेतलेली नाहीं. आतां जर मी सही परत घेतली तर मी मनुष्य ह्या संज्ञेस अपात्र ठरेन.

**पॉलव्हेरेलीः**--मी ह्या ठरावाविरुद्ध मत देणार, मग कोणी कांहींहि म्हणो ! मी मुसोलिनीचा अनुयायी म्हणून जन्मलों आणि मुसोलिनीचा अनुयायी म्हणूनच मरणार !

[ आतां सर्वजण चर्चेला कंटाळले आहेत. मुसोलिनीवर तर सर्व गोष्टींचा परिणाम स्पष्ट दिसत आहे. शेवटीं तो स्कोर्झाला ठराव मताला टाकण्याची सूचना करतो. ठराव मतास टाकण्यांत येतो. ग्रांडीच्या ठरावाच्या बाजूनें एकोणीस मतें पडतात; फक्त सहाच मतें विरुद्ध असतात. सुआर्डो तटस्थ राहतो. ]

**मुसोलिनी**( निर्जीवपणें, मोठ्या प्रयत्नांनीं उभा राहून ):--ठराव बादशहांना कोण सादर करील ?








## मुसोलिनीचा अधःपात

**काउंट ग्रांडीः**—तें तुमचेंच काम आहे.

**मुसोलिनीः**—ठीक आहे. मला वाटतें, आतां आपण जाऊं शकतों. तुम्हीं शेवटीं गोष्टी ह्या थराला आणल्या ! सभा बरखास्त झाली आहे.

[ तो बाहेर जात असतां स्कोर्झी नेहमींच्या पद्धतीनें ' सॅल्यूटे अल् ड्यूचे ' ही ललकारी देतो; पण एकटा पॉलव्हेरेलीच तिला उत्तर देतो. तारीख २५ जुलै १९४३, रविवारी, पहांटे तीन वाजून अठरा मिनिटें झालीं आहेत. मुसोलिनीच्या सुलतानशाहिवर शेवटचा पडदा पडतो. ]

---

**मरणान्तानि वैराणि !**

दक्षिण आफ्रिकेमध्यें युनिव्हर्सिटी व कॉलेजें मिळून सुमारें बारा आहेत. त्यांपैकीं तिहींतच हिंदी विद्यार्थ्यांना प्रवेश आहे. आणखी एका संस्थेंत युरोपियनेतर विद्यार्थ्यांकरितां कांहीं ठराविक वेळीं वर्ग चालवितात. पण ते देखील निराळ्या इमारतींमध्यें व तेथें कांहीं अभ्यासक्रमच फक्त शिकविले जातात. प्रयोगशाळेंतील कामाला योग्य अशी पुरेशी साधनसामग्रीहि पुरविली जात नाहीं. हिंदी विद्यार्थ्यांना युरोपियन विद्यार्थ्यांच्या इतकीच फी द्यावी लागते. तरी हा हिंदी विद्यार्थ्यांच्या वांट्याचा अपमानकारक पंक्तिप्रपंच टळत नाहीं. कॉलेजमधील युरोपियनेतर विद्यार्थ्यांना कॉलेजमधील क्रीडा किंवा सामाजिक संमेलनसमारंभ यांतून भाग घेतां येत नाहीं. अभ्यासक्रमेतर गोष्टींपुरताच हा वंशभेदनिष्ठ पंक्तिप्रपंच दिसून येतो असें नाहीं. वैद्यकीय ( medical ) शिक्षण घ्यायला युरोपियनेतरांना मज्जाव नाहीं. पण या युरोपियनेतर विद्यार्थ्यांना युरोपियन प्रेतांची मरणोत्तर शवपरीक्षा ( Post-mortem examination ) करावयाची परवानगी नाहीं; श्वेतवर्णीय शव प्रयोगशाळेंत आलें कीं, युरोपियनेतर विद्यार्थ्यांनीं तेथून बाहेर गेलें पाहिजे. या प्रकाराबद्दल कांहींहि खंत न बाळगतां तेथील राष्ट्रीय पक्षाचें मुखपत्र Die Transvaal लिहितें,—" विद्यार्थ्यांच्या याबाबतच्या विनंतीचा बिलकुल विचार करूं नये. नाहीं तर हा वर्णविषयक प्रश्न अधिकच बिकट होईल. ज्या युरोपियन मनुष्याला जिवंतपणीं आपण वरिष्ठ म्हणून आपण इतरांपासून निराळें राहावेंसें ( apartheid=segregation ) वाटतें, त्याला मरणोत्तर निराळी वागणूक काय म्हणून ? " हिंदी विद्यार्थ्यांना एंजिनियर, आर्किटेक्ट, इलेक्ट्रिशिअन, सर्व्हेयर, अकाउंटंट म्हणून सरकारी नोकरी मिळत नाहीं. त्यांना फक्त डॉक्टर आणि वकील हे धंदे करायला मोकळीक आहे, ही गोष्ट लक्षांत घेतली असतां वरील निर्बंधामुळें दक्षिण आफ्रिकेंतील हिंदी विद्यार्थ्यांचें जीवन किती अडचणींनीं व अपमानांनीं भरलें आहे याची कल्पना येईल. दक्षिण आफ्रिका देश हा ब्रिटिश राष्ट्रसंघा( Commonwealth )-चाच केवळ सभासद नाहीं तर संयुक्त-राष्ट्रसंघाचा देखील सभासद आहे. संयुक्त-राष्ट्रसंघाच्या एका सनदेंतील कलमांत मनुष्यजातीच्या सर्व घटकांना मूलभूत असें स्वातंत्र्य दिलें आहे असें म्हणतात. त्या कलमावर किती भयानक प्रकाश वरील प्रकारानें पडतो ?

—' हिंदू 'वरून.
( ६।४।४८ )







# शेताचें मनोगत

मेघराजा, अंबारींत
गर्जितांनीं घुमवित

★

धगधगत्या अग्नीनें
अंतरींच्या ओलाव्याचें
घोर यातना साहिल्या
वांचविलें पाडसांना
पूर्वी सळसळ रान
माझ्या गाईंचीं लेंकरें
आतां हंबारव त्यांचा
मूक वक्षावर आज
सारी सुगीच्या सुखाची
साहतील कैसे तेही
नांगराचा फाळ जावो
त्यांतूनच यावयाचें
भग्न हृदय त्यासाठीं
साऱ्या जगताचे शाप
दुष्काळांतील आंसवें
काय लिहिलें असेल

★

अंतराला जाळतो रे
मेघराजा साहिन मी
मेघराजा, पूर वाहो
चिंब ओलव शरीर
बीजें रोपूं दे, वाढूं दे
लोपूं देई आठवण
सोनियाच्या किरणांनीं
मेघराजा, भलरीचें
सप्तरंगी तोरणानें
सळसळ गीत माझें

★

आरोहुन येई त्वरें
येई, दिशांचीं कुहरें—

★

वक्षः-स्थळ विदारलें
निर्मूलन रे जाहलें.
मृगजळाच्या पुरांत
निष्प्रेमाच्या जीवनांत.
ह्याच वक्षीं नाचविलें
हर्षें त्यांना भरविलें.
येईनासा झाला कानीं
चिट-पांखरूं न कोणी.
आठवण ठेवणारे
तीव्र उन्हाळींचे वारे ?
खोल हृदयांत खूप !
पीक उद्यांचें उमाप !
आजवर तगविलें
जागेपणीं रे ऐकलें.
ओघळलीं वक्षःस्थळीं
दुष्टाव्याचें माझ्या भाळीं ?

★

ग्रीष्म ऋतूचा आठव
तुझें भीषण तांडव.
तुझ्या गर्जित-गंगेचा !
वास वाहो सुगंधाचा !
ठेव साउली कृपेची
वैभवांत वैगुण्याची.
उगवेल सुप्रभात
येथ घुमेल संगीत
तुझें वैभव नांदेल
आसमंत घुमवील !

--गणेश कुडे.








# गांधीजी आणि हिंदी साहित्य

प्रा. प्रभाकर माचवे

' नवभारता 'साठीं हिंदी वाङ्मयविषयक लेखमाला लिहावी असें बरेंच दिवसांपासून मनांत घोळत होतें. त्यांत गांधीजींच्या उपवासानंतर तर एकच विषय मनांत सारखा संव्याप्त आहे व तो म्हणजे गांधीजी ! शेवटीं मन आंवरून ' हिंदी साहित्याला गांधीजींचा वारसा ' या विषयावर कांहीं लिहिण्याचा हिय्या करीत आहें. वाङ्मयेतिहास किंवा आलोचना एतदर्थ लागणारा तटस्थपणा वा वस्तुनिष्ठता गांधीजींच्या बाबतींत मला तरी शक्य नाहीं. परंतु गांधीजी आत्मसाक्षात्कारवादी असले, तरी व्यक्तिवादी नव्हते. त्यांच्याबद्दल लिहावयाचें त्यांत वैयक्तिक गोष्टी कशाला आणावयाच्या ? पण भावनावेगामुळें त्या टाळणेंहि अशक्य. तरी मी या लेखांत गांधी-नीतीची वाङ्मयावर पडलेली छाया येवढीच बाजू महात्माजींच्या अनेक पैलूंच्या जीवनांतून उचलतों व यथामति विवेचन करतों.

## ' शैलीचें चारित्र्य '

इमर्सनचें एक वाक्य आहे कीं, ' To be great is to be misunderstood. ' ( माहात्म्य म्हणजे गैरसमज आलाच ! ) महात्माजी भारतीय राजकारणांत सक्रियपणें भाग घेऊं लागले चंपारण्यापासून. त्याबरोबर दक्षिण आफ्रिकेंतून तावूनसुलाखून आणलेलें एक तत्त्वज्ञान त्यांच्या पाठीशीं होतें. बिहारमध्यें गांधीजींचा सर्वांत अधिक प्रभाव साहजिकच पडलेला. तेथेंच त्यांना ती म्हातारी भेटली होती, जिनें आपल्या अंधळ्या डोळ्यांचें पारणें बापूंना स्पर्शून फेडलें होतें. खिस्त-चरित्रांतहि असाच एक प्रसंग आहे. बिहारची कोकटी खादी विणणारे जास्त लांब विणून, चर्खासंघाकडून तेवढीच मजुरी घेत असत. चंपारण्यापासून ते तहत बेचाळीसच्या आंदोलनाविषयीं बलदेव नारायणांच्या पुस्तकापर्यंत बिहार प्रांताच्या मनाची पकड गांधीजींच्या त्यागानें कशी घेतली आहे, हें स्पष्ट दिसून येतें. डॉ. राजेंद्रप्रसाद यांचें हिंदींत लिहिलेलें आत्म-चरित्र याची सुंदर साक्ष पटवील. एका धुरंधर राजकारणी पुरुषानें आपलें समग्र चरित्र अवलोकावें व त्यांत किंचिन्मात्र कडवटपणा येऊं देऊं नये, एकाद्याचें मन दुखवील असें एकहि वाक्य त्या विशाल ग्रंथांत आढळूं नये, हें माहात्म्य ' शैलीच्या चारित्र्यां 'त व्यक्त होतें. बिहारमधील राष्ट्रीय कवि रामधारीसिंह 'दिनकर' हे गांधीवधानंतर धाय मोकलून आक्रंदले—'बापू की यह नहीं जा रही अरथी भारतमाताकी ! ' गांधी-वधाच्या दुसऱ्या-तिसऱ्या दिवशीं सायंकाळीं पाटणा-रेडिओनें एक विलापांजलि देणारें कविसम्मेलन भरविलें होतें. हिंदी साहित्यांतील एकूणएक नामवंत बिहारी कवी त्यांत एकीहून दुसरी सरस अशी विलापिका म्हणून दाखवीत होते—' दिनकर ', ' केसरी ', ' आरसी ', ' मनोरंजन ', ' रामदयाल पांडेय ', ' मुक्त ' इत्यादि.

## ' खेड्यांसाठीं साहित्य द्या '

तीं मांगल्यमय पावलें चंपारण्यानंतर मार्च १९१८मध्यें इंदुराकडे वळलीं. आठव्या हिंदी साहित्य-संमेलनाचें त्यांनीं सभापतित्व केलें व पन्नास हजारांचा फंड देवीदास गांधींना देऊन मद्रासमध्यें हिंदीप्रचारार्थ धाडलें. साहित्य-संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणांतून गुजराथ-साहित्य-परिषदेच्या व








नंतर '३५मध्यें परत इंदूर येथील हिंदी–साहित्य–संमेलनाच्या अध्यक्षपदावरून, गांधीजींनीं आपल्या आवडत्या दोन लिप्या शिकण्याच्या व बहुभाषी बनण्याच्या मताचा प्रचार तर केलाच, पण त्याहिपेक्षां महत्त्वपूर्ण अशी पुढील मागणी केली:—"मला खेड्यांसाठीं साहित्य द्या ! मला तुमचें तें उच्च वाङ्मय, कला वगैरे समजत नाहीं. मला सरळ खेडुतांच्या जीवनाला उपयोगी व त्याला उदात्त बनविणारें वाङ्मय द्या ". त्यांची हांक कांहीं लेखकांनीं ऐकली; पण अजून ती भूक शमलेली नाहीं. देशाच्या विभागणीनंतर सात लाखांतील कांहीं कमी झाले असले तरी उरलेल्या देहातांतून तोच अज्ञानाचा अंधार व तोच अंधश्रद्धेचा चिखल माजलेला आहे ! साहित्य जर खरोखरींच सन्‌हित व तेंहि सर्वांसहित करणारें असेल, तर ज्ञानाची प्रकाशकिरणें अजून तेथवर पोंचलेलीं नाहींत, निष्ठेचीं सहस्रकमळें तेथें फुललेलीं नाहींत. प्रेमचंद याच सुमारास उर्दूंत लिहिणें कमी करून हिंदीकडे वळले. 'ग्राम–जीवन की कहानियाँ' हा त्यांचा एकच संग्रह जरी घेतला तरी त्यांत ज्या तीनशें–चारशें कथा त्यांनीं लिहिल्या त्यांतील जानपद–जीवनांतील मूक व्यथेला मुखर करण्याचा त्यांचा प्रयत्न आम्हांला नुट हैमसन व आयव्हॅन बुनिन यांची आठवण आणून देतो. प्रेमचंदांचा कित्ता गिरविणारे सुदर्शन, कौशिक, भगवतीप्रसाद वाजपेयी, उपेंद्रनाथ 'अश्क' व कांहीं अंशीं यशपाल हे कथाकार अजूनहि खेडवळ जीवनाशीं समरस होऊन कथा लिहितात; अजून एकाच सहानुभूतीनें ते, प्रेमचंदांनीं 'ईदगाह' व 'रामलीला' (त्यांच्या दोन नितान्तसुंदर भाव–कथा) लिहिल्या त्याच परंपरेला पुढें टिकवून धरीत आहेत. रामनरेश त्रिपाठी इत्यादींनीं ग्राम–गीतांचा संग्रह सुरू केला.

## हृदयपालटाचा तेजस्वी संदेश

मे १९१८चें अहमदाबादेंतील 'धर्मयुद्ध', जूनमधला खेडा जिल्ह्याचा सत्याग्रह, १९१९च्या नोव्हेंबरांत खिलाफत–सम्मेलनाचें सभापतित्व, १ ऑगस्ट १९२० रोजीं असहयोग–आंदोलन व २७ जून १९२४ला अहमदाबादेंत गांधीजींनीं दहशतवादी चळवळीविरुद्ध मांडलेल्या ठरावाला चित्तरंजनांचा प्रखर विरोध व गांधीजींच्या डोळ्यांत तरळलेले अश्रू, .... हीं सर्व मजूर, किसान, अल्पसंख्याक, हिंसावादी व साम्राज्यवादी क्षेत्रांतील पिळणुकीविरुद्ध गांधीजींच्या हृदय–परिवर्तनाच्या सिद्धांतांचीं प्रात्यक्षिकें होतीं. सत्याचा तो महान् प्रयोग वाङ्मयक्षेत्रांतहि आपला पडसाद घुमवूं लागला. वाङ्मयाचा व कलेचा संबंध हृदयाशीं व संवेदनांशीं असल्यामुळें व लेखक हे समाजांतील विष व पीडा पचविणारे 'सदाशिव' असल्यामुळें, ह. ना. आपट्यांच्या विधवा स्त्रिया, शरच्चंद्र चट्टोपाध्यायांच्या निमुटपणें सहन करीत जाणाऱ्या अबला नायिका, सन '२० ते सन '३४ पावेतोंच्या हिंदी कादंबऱ्यांतील कोणतेंहि स्त्रीपात्र (थोडेसे विदेशी प्रभावानें रेखाटलेले अपवाद वगळल्यास) घ्या. सर्वत्र हृदय–पालटाचा हा तेजस्वी संदेश कोरलेला आढळेल. 'आत्म–बलिदानानें विरोधकाचें अंतःकरण जिंकतां येईल; पाप वाईट, पापी नव्हे; अपराध्याला सर्वांत उत्तम दंड म्हणजे क्षमा.' या अहिंसेच्या किंवा विश्व–प्रेमाच्या उदात्त तत्त्वांचा पुरस्कार भारतीय वाङ्मयांत होऊं लागला. पण त्याचबरोबर ज्यांच्या आत्म्यांतून बलिदानाची, आत्मत्यागाची झळ सोसण्याइतकी प्रखरता नव्हती. ते रडवें वाङ्मय लिहूं लागले. साहित्यांत प्रत्येक युगांतच बावनकशी तद्वत्‌च 'रोल्ड गोल्ड इमिटेशन' चालतें. एक तुळशीदास झाला कीं, कैक रमते जोगी अक्षर–जुळणी करून स्वतःचें टोपणनांव तुलसी ठेवूं लागतात ! हिंदी काव्यांत 'छायावाद' नांवाचा जो प्रघात रूढावला व विशेषतः त्यांत वैयक्तिक प्रेमभंगामुळें किंवा तसल्याच कारणानें उत्पन्न झालेले दुःखाचे कढ जे वाढले ते याच सवंग अनुकरणाच्या मोहामुळें. पण त्यांतहि कांहीं श्रेष्ठ कवींनीं भोग आणि वैराग्य, आसक्ति व अनासक्ति यांचें हें मानसिक द्वंद्व ब्राउनिंगसारख्यांच्या प्रामाणिकपणानें व मीराबाईच्या आर्ततेनें वर्णिलें. सुमित्रानंदन पंतांचें 'गुंजन'मधील पहिलें गीत घ्या—'तप रे मधुर मधुर मन !' किंवा महादेवी वर्मांचें 'अतृप्ति' किंवा तसलेंच भावगीत घ्या—'बीन हूं तेरी, तुम्हारी रागिनी भी हूं, दूर हूं तुमसे अखंड सुहागिनी भी हूं !' सर्वत्र पीडेच्या अग्निदिव्यांतून










आत्म–तेजाच्या, शुद्धीच्या, सुवर्णतुल्य अनुभवाचा पडताळा सांपडतो. राष्ट्रीय कवी—यथा मैथिलीशरण गुप्त, 'एक भारतीय आत्मा', बालकृष्ण शर्मा 'नवीन', सुभद्राकुमारी चौहान, सोहनलाल द्विवेदी-यांनीं गांधी–विचारात्मक काव्य बरेंच लिहिलें. सियारामशरण गुप्तांचें 'बापू' व ठाकुरप्रसाद सिंहांचें 'महामानव' फार उत्तम आहेत. तसाच 'सोहनलाल द्विवेदी'–संपादित सर्व भाषांतील गांधी-विषयक कवितांचा ग्रंथहि आहेच.

## साहित्याला सत्याचें महत्त्व

गांधीजींच्या या विश्वप्रेमाच्या किंवा अहिंसेच्या साक्षात्कारांतून निघालेली दुसरी निष्ठा जी वाङ्मय–क्षेत्रांत फार महत्त्वाची ठरते, ती म्हणजे सत्याची. साहित्यांतील रस मात्र सत्याभास असा एक पक्ष आहे, तर फ्रेंच निसर्गवाद्यांप्रमाणें उघडें–नागडें सर्व जें यथार्थ तें सत्य असा दुसरा एकान्तिक पक्ष आहे. गांधीजींच्या सत्याला यथार्थाची ('रिआलिटी'ची) बैठक आहे, तथापि सत्याभासाचें (ॲपिअरन्सेस्‌चें) वावडें पण नाहीं. गांधींकडे चहा पिणारा किंवा मांसाहारी अतिथि गेला तर गांधी त्याच्या खाद्यपेयांची चौकशी करीत; त्याच्यावर आपलीं मतें लादीत नसत; पण मुद्दाम होऊन त्याच्या व्यसनांचा पाठपुरावाहि करीत बसत नसत. 'सहजं कर्म कौन्तेय सदोषमपि न त्यजेत्'. या सत्यधर्माच्या असि-धाराव्रताची खरी कसोटी स्त्री–पुरुष–संबंधांविषयीं बोलणें, लिहिणें किंवा आचरणें याविषयीं होई. 'सेक्स'-चा इतका बाऊ कां? व त्यावद्दल 'टॅबू' जर नाहीं, तर मग अतिचाराचा, केवळ 'सेक्ससाठीं सेक्स'चा आग्रह तरी कां? या समंजस, प्राकृतिक, समन्वयवादी दृष्टीनें गांधीजी विवाहोत्तर ब्रह्मचर्य प्रतिपादीत. तरुण मुलांमुलींच्या मिसळण्याकडे, त्यांतून प्रेमलग्नें जरी उत्पन्न झालीं तरी, गांधीजी सहानभूतिपूर्वक पाहत असत. ते स्वतःविषयीं 'स्टॉईक' होते, तरी त्यांना 'प्यूरिटन' म्हणतां येणार नाहीं. कारण सत्याचा किंवा ब्रह्मचर्याचा आग्रह अहिंसेला वा प्रेमाला सोडून ते कधींहि धरीत नसत. त्यामुळें आश्रमांत किंवा अन्यत्र जे तारुण्यसुलभ प्रमाद होत, त्यांच्या-कडे गांधीजी क्षमाशील वृत्तीनें पहात. वासनेचें शुद्ध प्रेमांत उत्तोलीकरण होऊं शकतें, यावर त्यांचा अखंड विश्वास होता. व्यक्तिगत बोलावयाचें नाहीं असें ठरविलें असलें तरी येथें मी स्वतःचें उदाहरण सांग-तोंच. बापूंनीं १९३९च्या डिसेंबरांत माझें एका आश्रम–कन्येशीं लग्न ठरविलें; प्रत्यक्ष तें लग्न झालें १९४०च्या नोव्हेंबरांत. या अवकाशांत गांधीजींनीं आम्हां दोघांना एकत्र हिंडण्या–फिरण्याची, एकत्र राहण्याची व बोलण्या–चालण्याची पूर्ण मुभा दिली होती. आम्ही हिंडून प्रार्थनेला किंचित् उशिरां आलों तर बापू वात्सल्यानें हंसत. जणूं काय ते म्हणत, 'चालायचेंच, तरुणांचें असें व्हायचेंच!' पण हें गृहस्थाश्रम पत्करणाऱ्यांविषयीं झालें. जे आश्रम–धर्मानें त्यांच्याजवळ राहत, त्यांच्या बाबतींत ते फार कडक असत. कधीं कधीं जास्त ताणण्यानें तुटण्या-पावेतोंहि पाळी यावयाची; प्रतिक्रिया साहजिक होई. नांवें देऊन उदाहरणें देणें आतां चांगलें नाहीं. असो. पण मला मुख्यतः म्हणावयाचें आहे तें हेंच कीं साहित्यांत देखील सत्याला हें अनावृत पारदर्शित्व आणून देणारे गांधीच! अश्लीलता न येऊं देतां स्त्री–पुरुषविषयक गोष्टी स्पष्टपणें व उघडपणें चिता-रण्यास फार थोर प्रकारचें नीतिधैर्य व अनासक्ति लागतात. तीं बापूंनीं साहित्यास दिलीं. ही गोष्ट निराळी कीं आम्ही साहित्यिक तितकेसे लायक ठरलों नाहीं व ज्याप्रमाणें अहिंसेच्या नांवानें आम्हीं दुबळेपणा, हळवेपणा व रडवेपणा प्रतिपादले, तसाच सत्याच्या नांवानें आम्हीं नग्नवादाचा पुरस्कार केला. या बाबतींत हिंदी वाङ्मयांत फार चर्चिलें गेलेलें जैनेंद्रकुमार यांच्या 'सुनीता' कादंबरीचें उदाहरण घेतां येईल. लेखकाची इच्छा निराळी होती, पण वाचकांनीं भलताच अर्थ घेतला! 'प्रसाददीक्षे'चेंहि नाहीं का तसेंच झालें? या-विषयीं फक्त रवींद्रनाथांच्या दोन ओळी देऊन ही चर्चा सूचक रीत्या संपवितों:—

प्रेम मोर भक्तिरूपे उठिबे फलिया ।
मोह मोर मुक्तिरूपे उठिबे ज्वलिया ॥

(अर्थ—माझें प्रेम भक्तिरूपानें सु–'फलित' होवो.
माझा मोह मुक्तिरूपानें ज्वलित होवो.)

सत्य–अहिंसा व त्यांतूनच निर्माण होणारे 'अस्तेय–अपरिग्रह–ब्रह्मचर्य–सर्वत्र भयवर्जनां'चे सिद्धांत यांनीं वाङ्मयाच्या अंतर्मनाची पकड घेतलेली दिसून येते.








गांधींचा प्रभाव हा असा, हा येथें, म्हणून नेमका बोट ठेवून दाखवितां येणार नाहीं; पण तो वातावरणाप्रमाणें सर्वत्र परिव्याप्त आहे. गांधीजींनीं ८ ऑक्टोबर १९१९ रोजीं 'यंग इंडिया' व गुजराथी 'नवजीवन' हीं साप्ताहिकें सुरू केलीं; १ ऑगस्ट १९२१ रोजीं हिंदी 'नवजीवन' चालू झालें. १० मार्च १९२२च्या 'यंग इंडियां'त तीन राजद्रोहात्मक लेख लिहिल्यामुळें गांधीजी पकडले गेले व कारावासांत 'आत्मकथा' लिहिली गेली. त्यानंतर वृत्तपत्रांच्या इतिहासांत कितीतरी संपादकांनीं अशा प्रकारच्या लिखाणांमुळें कारावास भोगला व कितीतरी पुढाऱ्यांनीं जेलच्या शांत एकांताचा लेखनकार्यासाठीं उपयोग केला ! पंडित नेहरूंची आत्मकहाणी व मौलाना आझादांची काव्यमय पत्रें याच प्रकारें जन्मास आलीं. पण गांधीजींचा वृत्तपत्रविषयक कडकपणा फार थोड्या लोकांना पाळतां आला––तो म्हणजे जाहिराती न घेतां, एकाद्या तत्त्वासाठीं पत्र चालविणें. त्याचप्रमाणें गांधीजींनीं कॉपीराइट कायदाहि झुगारून टाकला. हिंदींतील अधिकांश साप्ताहिकें 'हरिजन'च्या उष्ट्यावर पोसलीं जात होतीं ! आतां त्यांना तेवढीं पृष्ठें कशीं भरून काढवयाचीं हा प्रश्न पडला असेल !

## गांधीजींची अननुकरणीय भाषाशैली

गांधीजींची वाङ्मयाला सर्वांत मोठी देणगी जर कोणती असेल तर ती त्यांच्या गद्यशैलीची. जशीं तत्त्वें, तशी शैली. ऋजु, सहज, प्रसन्न, समतोल, शांत, धीर–गंभीर, दृढ, विनम्र, ओघवती, दृष्टांत–प्रचुर, औपनिषदिक (बिब्लिकल), अभिजात (क्लासिकल), गर्भितनर्मविनोदमयी, स्पष्ट आणि हृदयवेधक अशी विशेषणांची माळ गुंफूनहि त्या शैलीचें पुरेसें वर्णन होऊं शकणार नाहीं, तिची तारीफ (मूळ अर्थ परिभाषा) करतां येणार नाहीं. गांधींच्या शैलींत त्यांचें व्यक्तिमत्त्व सांठविलेलें आहे. उदाहरणें देत बसून मी लेखाचें कलेवर वाढवूं इच्छीत नाहीं. पण '४२च्या उन्हाळ्याच्या सुट्टींत मी आश्रमांत होतों तेव्हां, फ्रान्समधून नुकतेच परतलेले इंग्रजींतून लिहिणारे भारतीय लेखक राजाराव तेथें होते. त्यांनीं त्या वेळीं गांधीजींच्या नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या 'विधायक कार्यक्रमा'च्या पुस्तिकेंतील निरलंकार असूनहि गांधीजी फार समर्पक उपमांचा उपयोग करतात हें सिद्ध करण्यासाठीं दाखविलेलीं वाक्यें अशीं:––'पीक तर पुष्कळ आलें, पण कापणी करणाऱ्या मजुरांचीच वाण आहे', 'हातच जर लुळा पडला तर चमच्याचा काय उपयोग ?', 'स्वराज्य एकाएकीं आभाळांतून पडणार नाहीं, एक एक वीट रचून आम्हांला ती इमारत रचावयाची आहे !' इत्यादि. उदाहरणेंच देऊं लागलों तर त्यांना अंत नाहीं. फक्त एकच गोष्ट शेवटीं सांगावीशी वाटते व ती ही कीं गांधीजींची शैली अननुकरणीय आहे. कैक गांधी–भक्त त्या पद्धतीची नक्कल करूं पाहतात; पण प्रत्येक महत्तम गोष्ट अद्वितीयच राहते. हिमालय किंवा ताजमहाल परत दुसरा सांपडणार नाहीं. गांधीजींची शैलीहि अशीच 'एकमेवाद्वितीय' होती. तिची प्रतिकृति असंभव.

———

## स्वराज्याची मनोवृत्ति

वसंत ऋतूंत सौंदर्य प्रत्येक झाडांतून प्रतिबिंबित होत असतें; सबंध पृथ्वी तारुण्याच्या टवटवीनें बहरून येते. त्याचप्रमाणें स्वराज्याची खरी मनोवृत्ति समाजांत जर भिनली असेल तर जीवनाच्या प्रत्येक अंगोपांगांतून नवीन चैतन्य सळसळतांना आढळून येईल. राष्ट्रांतील सर्व लोक आपापल्या मगदुराप्रमाणें विविध प्रकारचीं सार्वजनिक कामें करून राष्ट्राची सेवा करतांना आढळतील.

––महात्मा गांधी.



अनुक्रमणिका






# स्वतंत्र मानवाचा धर्म

बर्ट्रांड रसेल [ अनुवादक—प्रा. मे. पुं. रेगे ]

* डॉ. फाउस्टच्या अभ्यासिकेंत मेफिस्टोफेलिसनें सृष्टीच्या निर्मितीची कथा त्याला सांगितली ती अशीः—

" देवदूतांचें अंतहीन स्तुतिगायन आतां कंटाळवाणें होऊं लागलें होतें; त्यांनीं त्याची स्तुति करणें हें योग्यच नव्हतें काय ? त्यानें त्यांना शाश्वत आनंद दिला होता. उलट आपण ज्यांचा छळ करतों अशा जीवांकडूनच आराधना व स्तुति करून घेण्यांत अधिक मौज आहे. तो स्वतःशींच हंसला व हा महान् खेळ करून पाहण्याचा त्यानें निश्चय केला.

"अनंत युगेंपर्यंत तो जळता अग्निगोल अंतराळांतून प्रदक्षिणा घालत होता. हळूहळू तो आकार धारण करूं लागला, त्याच्या मध्यापासून अनेक ग्रह सुटून वेगळे झाले, त्यांच्यावर उकळत्या द्रवांचे समुद्र व अग्नीचे पर्वत उचंबळत व इतस्ततः फेंकले जात होते, आणि काळ्याकभिन्न मेघराशींतून उष्ण पाऊस कोसळून पृथ्वीचा अर्धद्रव पृष्ठभाग त्याखालीं बुडून गेला होता. मग सागराच्या खोल तळीं सूक्ष्म जीवमान जंतू निर्माण झाले आणि जीवनाला पोषक असलेल्या त्या उर्वेत त्यांचा भराभर विकास झाला. प्रचंड वृक्षांचीं मोठीं अरण्यें उगवलीं, पाणथळ रणांतून अजस्र निवडुंगें फोंफावलीं, राक्षसी जलचर प्राणी उदयाला आले, भराभर वाढले व एकमेकांशीं लढून व एकमेकांना फस्त करून नाश पावले. आतां खेळाला रंग चढूं लागला. अजस्र जलचरांपासून मानवाची उत्पत्ति झाली. मानवाला विचार करण्याची शक्ति होती, चांगलें व वाईट यांचें ज्ञान त्याला होतें व विशेष म्हणजे कशाची तरी पूजा करण्याच्या क्रूर तहानेची देणगी त्याला लाभली होती. या राक्षसी जगांत सारें आस्तित्व क्षणभंगुर आहे, सर्वभक्षक मृत्यूच्या तावडींतून कांहींहि करून कित्येक क्षण तरी स्वतःला वांचवावयाला सर्व प्राणिमात्र धडपडत आहेत हें मानवानें पाहिलें आणि तो

---

* प्रस्तुत लेख हा सुप्रसिद्ध आंग्ल तत्त्ववेत्ता बर्ट्रांड रसेल याच्या " A Free Man's Worship" या निबंधाचा ( किंचित् ) स्वैर अनुवाद आहे. मूळ निबंध १९०२मध्यें लिहिला गेला होता व १९०३च्या Independent Reviewमध्यें प्रथम प्रसिद्ध करण्यांत आला होता. आपल्या 'Mysticism and Logic' या लेखसंग्रहांत रसेलनें १९१७मध्यें त्याला परत प्रसिद्धि दिली. या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत रसेलनें या निबंधाविषयीं खालील उद्‌गार काढले आहेतः—

" ........(प्रथम निबंध लिहिला ) त्या वेळीं मूल्यांच्या वस्तुनिष्ठतेविषयीं मला जितकी खात्री वाटत होती, तितकी आज वाटत नाहीं. पण धार्मिक श्रद्धेचा आधार ज्यांना नाहीं अशा व्यक्तींनीं, अवघड, बिकट कालखंडांत जर आंतरिक पराभव टाळावयाचा असेल तर त्या निबंधांत सुचविलेल्या वृत्तीसारखीच वृत्ति जीवनाबाबत धारण केली पाहिजे असें मला अजूनहि वाटतें." —अनुवादक.








म्हणाला, 'आपल्याला न उलगडणारा असा कांहीं तरी गुप्त हेतु या सगळ्यामागें असला पाहिजे व तो हेतु चांगलाच असला पाहिजे. कारण आपण कशाची तरी पूजा करणें आवश्यक आहे आणि या दृश्य सृष्टींत पूज्य असें कांहींच आढळत नाहीं.' आणि मग आपल्यासभोंवतीं चाललेल्या जीवनकलहापासून मानव दूर झाला. कारण या सर्व गोंधळामधून मानवी प्रयत्नांनीं सुसंगति निर्माण व्हावी अशीच ईश्वराची इच्छा आहे असा त्यांचा निश्चय झाला होता. आणि ईश्वरानें त्याच्या हिंस्र पूर्वजांपासून त्याला प्राप्त करून दिलेल्या सहज-प्रवृत्तींना अनुसरून स्वतःकडून आचरण घडलें कीं, त्याला तो "पाप" म्हणूं लागला व ईश्वराची क्षमा मागूं लागला. पण कदाचित् न्यायी ईश्वर आपल्याला क्षमा करणार नाहीं या भीतीनें ईश्वरी कोप कशा रीतीनें शांत करतां येईल याची एक दैवी योजना त्यानें आपल्या कल्पनेनें निर्माण केली. आणि वर्तमानकाळ दुःखमय आहे असें पाहून त्यानें तो अधिकच असह्य केला; कारण त्यायोगें भविष्यकाल अधिक सुखाचा होईल असें त्याला वाटलें व जो अल्पसा आनंद मिळणें शक्य होतें त्याचाहि त्याग करण्याची शक्ति आपणास दिल्याबद्दल त्यानें ईश्वराचे आभार मानले. आणि ईश्वर हंसला व मानवाची भक्ति व विरक्ति पराकोटीला गेल्याचें जेव्हां त्याला दिसून आलें तेव्हां त्यानें अंतराळांतून दुसरा सूर्य सोडला व तो मानवाच्या सूर्यावर आदळून सारें कांहीं पुनः आद्य अग्निगोलांत विलीन झालें!

"आणि ईश्वर पुटपुटला, 'हा खेळ चांगला रंगला; परत करून पाहिला पाहिजे'."

भौतिक शास्त्रांच्या दृष्टींतून दिसणारें विश्वाचें स्वरूप साधारण असेंच, किंबहुना अधिकच अर्थशून्य, अधिकच निर्हेतुक असलेलें आढळतें. आणि अशा या विश्वांतच यापुढें आपल्या ध्येयांना स्थान शोधून काढावें लागणार आहे. मानवाची उत्पत्ति ज्या शक्तींपासून झाली त्यांना आपण साध्य करीत असलेल्या कार्याचें पूर्वज्ञान नव्हतें. त्याचा उदय, त्याचा विकास, त्याच्या आशा, त्याची भीति, त्याची इच्छा व त्याचें ज्ञान या साऱ्यांचें मूळ अणुरेणूंच्या यदृच्छया घडून आलेल्या संयोगांत आहे आणि 'केवढेंहि उज्ज्वल धैर्य असलें, भावनांची व विचारांची केवढीहि तीव्रता असली तरी त्यांमुळें व्यक्तीचें जीवन चितेंत जळून भस्म होण्यापासून चुकूं शकत नाहीं, युगायुगांचे सारे परिश्रम, सारी निष्ठा, सारी स्फूर्ति, मध्यान्हींच्या सूर्याप्रमाणें तळपणारी मानवी प्रतिभा, हें सारें कांहीं ही सूर्यमालिका नाश पावतांच निश्चितपणें समूळ नष्ट होणार व मानवाच्या कर्तृत्वाचें हें मंदिर अखेरीस विश्वविनाशाच्या खाईंत गडप होणार! या साऱ्या गोष्टी अगदींच शंकेपलीकडे नसल्या तरी इतक्या निश्चित आहेत कीं, त्या अमान्य करणारें कोठलेंच तत्त्वज्ञान यापुढें टिकूं शकणार नाहीं. या सत्याच्या आधारावर, दुर्दम्य निराशेच्या खंबीर पायावरच मानवी आत्म्याचें निवासस्थान यापुढें सुरक्षितपणें बांधतां येईल.

अशा या सर्वस्वीं परक्या व अमानुष जगांत मानवासारख्या दुबळ्या जीवाला आपल्या आकांक्षा विशुद्ध कशा राखतां येतील? सर्वशक्तिमान् पण अंध असलेल्या निसर्गानें अवकाशाच्या अफाट व भयाण विस्तारांत फेऱ्या घालतांना अखेरीस मानवासारख्या अपत्याला जन्म द्यावा हें केवढें विलक्षण गूढ आहे! कारण (अंध) निसर्गशक्तींच्या अधीन असून सुद्धां मानव डोळस आहे, चांगलें आणि वाईट यांचें त्याला ज्ञान आहे व आपल्या अजाण मातेच्या सर्व कृतींची पारख करण्याची शक्तिहि त्याला आहे. आपल्या मातेच्या सार्वभौमत्वाची निशाणीच असा जो मृत्यु त्याच्या अंकित असून सुद्धां आपल्या अल्प आयुष्यांत ज्ञानार्जन करण्याचें, चिकित्सक बुद्धीनें टीका करण्याचें व कल्पनेंतून नवनिर्मिति करण्याचें स्वातंत्र्य मानवाला आहे. मानवाला परिचित असलेल्या विश्वांत हें स्वातंत्र्य फक्त मानवालाच लाभलेलें आहे व त्याच्या बाह्य जीवनावर अबाधितपणें ताबा ठेवणाऱ्या शक्तींवरील त्याची श्रेष्ठता ह्याच्यांतच सामावलेली आहे.

निसर्गाच्या शक्तींपुढील स्वतःच्या दुर्बलतेची विपण्ण जाणीव आपल्याप्रमाणें रानटी माणसाला पण असते. पण केवळ बलापेक्षां अधिक पूजनीय अशा तत्त्वांचा त्याच्या अंतरंगांत पूर्णपणें अभाव असल्यामुळें आपल्या देवतांपुढें विनम्र व्हावयाला तो सदैव तयार असतो. त्या देवता खरोखरच पूज्य

आहेत कीं नाहींत हा प्रश्नहि तो करीत नाहीं. या तामसी देवांना संतुष्ट करण्याच्या आशेमुळें घडून आलेल्या नरमेधांची, मानवी अधोगतीची, क्रौर्याची व अनान्वित छळाची लांब कहाणी अत्यंत करुण व भीषण अशीच आहे. स्वतःजवळील सर्वांत मूल्यवान् वस्तू त्यांच्या चरणीं स्वेच्छेनें अर्पण केली म्हणजे तरी त्यांची रक्तपिपासा शांत होईल व मग आपल्याकडून अधिकाची अपेक्षा ते करणार नाहींत असें भीतीनें थरथरणाऱ्या या भक्तांना वाटत असतें. पूजेचे हे सारे अघोरी पंथ म्हणजे गुलामगिरी ज्यांच्या अंतःकरणांत भिनून गेली आहे व आपले स्वामी वंदन करण्याच्या लायकीचे नाहींत हा विचार मनामध्यें सुद्धां आणूं देण्यास जे तयार नसतात अशा गुलामांची भ्याड शरणागति होय. मानवी जीवनांतील आदर्शांच्या स्वतंत्र स्थानाची जाणीव अजून पुरती झालेली नसते आणि म्हणून जीवांना बेदरकारपणें दुःख देण्यांतच ज्या बलाची सार्थकता होते त्याची सुद्धां निःशंकपणें पूजा होऊं शकते व त्यांनाहि आदर मिळूं शकतो.

पण नीतिमत्ता जसजशी अधिक कणखर बनत जाते, तसतशी आदर्शांच्या स्वतंत्र अस्तित्वाची व हक्कांची जाणीव अधिक तीव्रतेनें होऊं लागते व रानटी मानवानें निर्माण केलेल्या देवतांची पूजा होणें अशक्य होतें. अजूनहि कित्येकजण असे आढळतात कीं, मानवी आदर्शांच्या हक्कांची जाणीव असून सुद्धां त्यांना तें जाणूनबुजून झिडकारतात व केवळ बल हेंच पूज्य आहे असें प्रतिपादन करतात. ईश्वरानें जॉबला झंझावातांतून जें उत्तर दिलें त्यांत हीच वृत्ति प्रकट झालेली आढळते. ईश्वरी सत्तेचें व सर्वज्ञतेचें स्तोम त्यांच्यांत माजवलेलें आढळतें. पण ईश्वराच्या मांगल्याचा त्यांत उल्लेखहि केलेला आढळत नाहीं. आणि आज सुद्धां आपणांपैकीं जे कोणी सारी नीतिमत्ता जीवनकलहावर आधारतात व त्यांत जे तग धरूं शकतात तेच जगण्याला सर्वांत अधिक योग्य असें मानतात, त्यांची वृत्तीहि अशीच असते. पण नीतिकल्पनांना इतकें विरोधी असलेलें मत जे स्वीकारूं शकत नाहींत ते एक वेगळीच भूमिका अंगीकारतात व ही भूमिका विशेषेंकरून धार्मिक मानली जाते. या मताप्रमाणें दृश्य सृष्टि व आदर्श यांतील विरोध केवळ आभासात्मक असून वास्तविक पाहतां वस्तुस्थिति आदर्शाशीं सुसंगतच आहे. अशा रीतीनें मानव सर्व सत्ता व मांगल्य यांचें निधान असलेला ईश्वर निर्माण करतो.

पण वस्तुस्थिति निश्चितच आदर्शरूप नाहीं; म्हणून तिची श्रेष्ठता मान्य करण्यांत आपल्या बुद्धीची जी गुलामी वृत्ति प्रकट होते तीपासून आपले विचार शुद्ध राखणें आवश्यक आहे. कारण विश्वांतील अ-मानवी शक्तींचें वर्चस्व झुगारून देऊन मानव्याची उच्च भूमिका सतत संभाळणें हें नेहमींच श्रेयकर असतें. आणि जेव्हां 'केवळ बल हें त्याज्य आहे व मूल्यांचें ज्ञान असलेला मानव त्यांविषयीं सर्वस्वीं अंध असलेल्या विश्वांत एक असहाय क्षुद्र जीव आहे' ही जाणीव आपल्या मनांत ठसते, तेव्हां आपल्यापुढें परत प्रश्न उभा राहतो: "आपण बलाची उपासना करणार कीं मांगल्याची? या अपूर्ण, अमंगल विश्वाची निर्मिति करणाऱ्या ईश्वराची आराधना आपण करणार कीं आपल्याच सदसद्विवेकबुद्धीनें निर्माण केलेल्या आदर्शांचें अधिष्ठान म्हणून कल्पिलेल्या ईश्वराची?"

या प्रश्नाचें उत्तर अत्यंत महत्त्वाचें आहे व आपल्या सर्व नीतिमत्तेवर त्याचा सखोल परिणाम होतो. कार्लाइल, नीत्शे यांच्या लिखाणांतून, तद्वतच एकंदर लष्करीवादांत प्रकट होणारी पाशवी बलाच्या उपासनेची वृत्ति हा या विरोधी विश्वांत स्वतःच्या आदर्शांची शुद्धता राखण्यांत आलेल्या अपयशाचा परिणाम आहे; चांगल्यानें वाईटापुढें घातलेलें तें एक लोटांगण आहे. जर सामर्थ्याचाच आदर आपण करणार असलों तर "परिस्थितीपुढें इलाज नाहीं!" असें म्हणत कितीहि गर्ह्य परिस्थिति असली तरी तिचा मुकाट्यानें स्वीकार करण्याचा मोह जे दूर सारूं शकतात त्यांच्या सामर्थ्याचा आपण आदर करूं या. या आपल्याला परिचित असलेल्या विश्वांत पुष्कळ गोष्टी आहेत त्याहून अधिक चांगल्या असूं शकल्या असत्या व आपण उराशीं कवटाळलेल्या ध्येयांची पूर्तता या अपूर्ण जड विश्वांत होणार नाहीं हें आपण मान्य करूं या व मग सत्य, सौंदर्य व या जीवनांत आपल्याला सदैव अलभ्य राहणारें आपलें पूर्णतेचें ध्येय यांविषयींचा आपला पूज्यभाव--जरी या भौतिक विश्वांत त्यांना कांहींहि स्थान नसलें तरी--आपण कायम







टिकवूं या. पाशवी बल त्याज्य आहे हें खरें असेल तर आपल्या हृदयांतून आपण त्याचा त्याग करूं या. याच्यांतच मानवाचें स्वातंत्र्य आहे. मांगल्यावरील आपल्या प्रेमानें निर्माण केलेल्या ईश्वराचीच आराधना करण्यांत, दिव्य स्फूर्तीच्या कांहीं महान् क्षणांत अल्पकाल प्रतीत होणाऱ्या स्वर्गाची उपासना करण्यांतच मानवाचें खरें स्वातंत्र्य सामावलेलें आहे. आपल्या कृती व इच्छा यांना बाह्य शक्तींच्या जुलुमी सत्तेपुढें सतत मान वांकवावी लागते; पण चिंतनांत आणि आपल्या आकांक्षांत आपण पूर्णपणें स्वतंत्र असतों. आपल्या साथीदारांपासून, आपलीं दुबळीं शरीरें ज्यावरून क्षीणपणें सरपटतात त्या ग्रहापासून, फार काय पण जिवंत असेपर्यंत मृत्यूच्या साम्राज्यापासून सुद्धां आपण स्वतंत्र असतों. जीवनांतील आदर्श सतत दृष्टीपुढें राखत जगण्याला लागणारें सामर्थ्य आपण अंगीं बाणवूं या व तें दृश्य डोळ्यांपुढें ठेवूनच प्रत्यक्ष जगांत कार्य करावयाला आपण उतरूं या.

वस्तुस्थिति व आदर्श यांतील विरोध जेव्हां प्रथमच स्पष्टपणें दृग्गोचर होतो तेव्हां मानवी स्वातंत्र्य अबाधित राखण्यासाठीं बंडाची प्रखर भावना चेतविणें, देवांविषयींच्या तीव्र द्वेषभावनेनें जळत राहणें आवश्यक आहे असें वाटतें. विश्वांतील विरोधी शक्तींना सतत उघडपणें आव्हान देणें, त्यांचा दुष्टपणा सतत दृष्टीपुढें राखणें व त्यांचा सतत द्वेष करणें, दैव खुनशीपणानें जें जें दुःख लादील त्याचा आपण होऊन स्वीकार करणें हें सारें, भवितव्यतेपुढें मान तुकवावयाला जे तयार नाहींत, त्या सर्वांचें कर्तव्यच आहे असें वाटतें. पण हा संताप सुद्धां बंधनरूप होय. कारण त्यायोगें आपले विचार या जड विश्वांतील अमंगलतेशीं खिळून राहतात. आणि शिवाय या बंडाचा जन्म ज्या दुर्दम्य इच्छांतून होतो त्यांच्यामागें एक प्रकारचा अहंभाव असतो व या अहंभावावर विजय मिळवणें ज्ञानी पुरुषाला आवश्यक असतें. हा संताप म्हणजे आपल्या विचारांची शरणागति होय, आपल्या इच्छांची नव्हे. उलट आपल्या इच्छांचें दमन करून आपले विचार स्वतंत्र ठेवण्यांत खरें स्वातंत्र्य आणि शहाणपण आहे. आपल्या इच्छांच्या विनम्रतेंतून तितिक्षेचा उदय होतो; आणि विचारांच्या स्वातंत्र्यांतून कला व तत्त्वज्ञान यांचें सारें विश्व, तशीच सौंदर्याची दिव्य सृष्टि निर्माण होते. अधीर इच्छांच्या भाराखालीं वांकून न गेलेल्या विचारांना व अनिर्बंध चिंतनालाच सौंदर्याच्या दिव्य दृश्याचा लाभ होऊं शकतो व क्षणभंगुर वैयक्तिक सुखसाधनांची मागणी जे जीवनाकडे करीत नाहींत त्यांनाच अंतिम स्वातंत्र्य मिळूं शकतें.

निवृत्तिमार्गाचा स्वीकार करणें म्हणजे विश्वाची दुःखमयता व अमंगलता मान्य करण्यासारखें असलें तरी त्या मार्गाचें प्रतिपादन करण्यांत ख्रिश्चन धर्मानें या बंडखोरीच्या तत्त्वज्ञानापेक्षां अधिक शहाणपणा प्रकट केला आहे. ज्या गोष्टींची आपण इच्छा करतों त्यांपैकीं कित्येक जरी अलभ्य ठरल्या तरी खरोखरच मूल्यवान् असतात हें मान्य केलें पाहिजे. पण, उलट, दुसऱ्या अनेक गोष्टी, आपण त्यांची तितक्याच तीव्रतेनें इच्छा करीत असलों तरी, पूर्णपणें विशुद्ध नसतात हेंहि मान्य केलें पाहिजे. या जीवनांत ज्या इच्छांचा त्याग करावा लागतो त्या सर्व वाईट, हीन असतात हा समज नेहमींच खरा नसला तरी पुष्कळदां आपल्या प्रमाथी वासनांना वाटतें त्यापेक्षां अधिक खरा असतो. व तो नेहमीं खरा असतो ही धर्माची कठोर शिकवण आपल्या वासनांना विशुद्ध करण्याचें मोठेंच साधन आहे.

पण विरक्तींत चांगुलपणाचा आणखी एक अंश असतो. खरोखरच मूल्यवान् असलेल्या वस्तूंसाठीं सुद्धां, जर त्या अलभ्य असल्या तर, व्यर्थ हळहळत मनःशांति गमावणें अनिष्ट आहे. प्रत्येक व्यक्तीवर आयुष्यांतील आपल्या अत्यंत आवडत्या इच्छांना तिलांजलि देण्याचा प्रसंग कधींना कधीं येतोच. तरुणांना अप्राप्य असें कांहींच नसतें. प्राण पणाला लावून इच्छिलेली वस्तु सुद्धां अलभ्य राहूं शकते यावर त्यांचा विश्वासच बसत नाहीं. पण मृत्यु आणि व्याधि, दारिद्र्य व कर्तव्याची कठोर हांक यांच्याकडून आपणांपैकीं प्रत्येकाला हें शिकावेंच लागतें कीं, हें जग आपल्याकरितां निर्माण करण्यांत आलेलें नाहीं व आपण इच्छिलेल्या वस्तू कितीहि मूल्यवान् असल्या तरी त्यांच्या प्राप्तीआड दैव कदाचित् येईलहि. आणि दुर्दैवाचा घाला जेव्हां येतो, तेव्हां आपल्या आशांचा झालेला चकाचूर न डगमगतां सहन करणें व व्यर्थ हळहळ करीत न बसणें







हें अत्युच्च धैर्याचें लक्षण आहे. दैवापुढें अशा रीतीनें मान वांकविणें हें अयोग्य तर नाहींच, उलट त्यांतच खरें शहाणपण आहे.

पण केवळ वैराग्याचें तत्त्वज्ञान एकांगी होय. कारण आपल्या ध्येयांची पूजा आपण जेथें करूं शकूं तें मंदिर केवळ वैराग्याच्या पायावर उभारतां येणार नाहीं. अपयश आणि निराशा यांनीं डागळलेल्या वास्तवतेपासून दूर, जेथें दुःखाचा स्पर्श होत नाहीं, काळाचे हात जेथें पोहोंचूं शकत नाहींत, पण केवळ शुद्ध सौंदर्य जेथें विलसत असतें, अशा त्या मंदिराची जीवाला वेडावून सोडणारीं अंधुक दृश्यें कल्पनासृष्टींत, संगीतांत, शिल्पकलेंत, बुद्धीचें शुद्ध साम्राज्य जेथें पसरलेलें असतें अशा शास्त्रांत, भावगीतांतील संधिकालीन सोनेरी जादूच्या वातावरणांत, कोठें कोठें दृष्टोत्पत्तीस येतात. या दृश्यांच्या चिंतनानें स्वर्गाचें एक दिव्य दृश्य आपल्या हृदयांत आकार धरूं लागतें व त्याच्या प्रकाशांत या जगांतील वस्तूंच्या खऱ्या मूल्यांची पारख आपणांला करतां येते व विश्वांतील कण—कण सौंदर्य जमवून तें दिव्य मंदिर बांधण्याची स्फूर्तीहि आपणांला त्याच्यापासून मिळते.

जन्मतःच निष्पाप असलेले कित्येक महात्मे सोडले तर इतरांना त्या मंदिरांत प्रवेश मिळण्यापूर्वी निराशेच्या काळोखानें भरलेल्या काळोख्या गुहेंतून मार्ग आक्रमावा लागतो. त्या मार्गावर परित्यक्त आशांचीं थडगीं ठिकाठिकाणीं बांधलेलीं असतात. व तेथें जेव्हां अहंकार मरतो व अधीऱ्या लोभी वासनांचा क्षय होतो तेव्हांच दैवाच्या साम्राज्यापासून आत्मा स्वतंत्र होऊं शकतो. आणि या गुहेंतून वैराग्याच्या द्वारानें ज्ञानाच्या सूर्यप्रकाशांत बाहेर पडणाऱ्या यात्रेकरूला एक नवीन दृष्टि प्राप्त होते व एका नवीन कोमल आनंदांत त्याचें हृदय न्हाऊन निघतें.

निसर्गशक्तीपुढील आपल्या दुर्बलतेमुळें वैतागून जाऊन बंड न पुकारतां दैवाचा आपल्या बाह्य जीवनावरील ताबा आपण शांतपणें सहन करावयाला शिकलों व मानव्यापलीकडे या विश्वांत वंद्य असें कांहींच नाहीं ही पक्की जाणीव हृदयांत बाळगली, कीं मग कल्पनाशक्तीनें या जड विश्वाला एक वेगळा आकार, अधिक रम्य स्वरूप देतां येतें; मातीनें घडविलेल्या जुनाट मूर्तीतून कल्पनेच्या किमयेनें एक तेजस्वी सुवर्णप्रतिमा निर्माण करतां येते. सृष्टीच्या विविध दृश्यांत—— वृक्ष, पर्वत आणि मेघांचे दृश्य आकार ह्यांत, मानवी जीवनांतील विविध प्रसंगांत, फार काय, मृत्यूच्या सर्वंकष भीषण साम्राज्यांत सुद्धां आपणच चिंतनांतून निर्माण केलेलें सौंदर्य प्रतिबिंबित झालें आहे असें सृजनशील ध्येयवादी मनाला आढळून येतें. अशा रीतीनें अचेतन विश्वावरील आपलें वर्चस्व मानवी मनाला पुनः प्रस्थापित करतां येतें. वास्तवता जितकी अधिक दुखःमय व अमंगल तितकीच, तिचा अभेद्य खडक फोडून आंत लपलेली बहुमोल संपत्ति हस्तगत करण्याची कामगिरी अधिक श्रेयस्कर ठरते व विरोधी शक्तींवर मात करून मिळविलेला विजय अधिक अभिमानास्पद ठरतो. सर्व कलांत शोकांतिका (Tragedy) अधिक विजयी व बलशाली आहे; कारण शत्रुप्रदेशाच्या बरोबर मध्यावर, त्याच्या सर्वोच्च शिखरावरच, शोकांतिका आपला बालेकिल्ला उभारते. त्याच्या अभेद्य बुरुजांवरून शत्रूचा तळ व दारूगोळा, त्याचें सैन्य व किल्ले, सारें कांहीं स्पष्टपणें दृष्टीस पडतें. त्याच्या चार तटांआड मानवाचें स्वतंत्र जीवन अप्रतिहतपणें चालू असतें व बाहेर पसरलेल्या मृत्यु, दुःख, निराशा आणि नियति यांच्या अफाट सैन्याच्या दृश्यांतून त्या शूर नगराच्या नागरिकांना नवीन नवीन सौंदर्य प्रतीत होत असतें. जीवनांतील सर्व उदात्त सौंदर्य जेथून स्पष्टपणें दिसूं शकतें त्या ह्या पवित्र नगराचे नागरिक त्रिवार धन्य होत ! आणि ज्या शूर योद्ध्यांनीं विरोधी शक्तींशीं युगानुयुगें झगडत मानवी स्वातंत्र्याचा अमूल्य ठेवा जतन केला व रानटी आक्रमकांपासून हें अजिंक्य नगर भ्रष्ट होण्यापासून बचावलें त्यांचा सन्मान असो !

पण दुःखांतिकेच्या सौंदर्यांत जीवनाचा जो धर्म उजळून दिसतो, तो कमीअधिक स्पष्ट स्वरूपांत जीवनांत सर्वत्र अस्तित्वांत असलेला आढळून येतो. मृत्यूच्या भीषण दृश्यांत, असह्य वेदना शांतपणें सहन करण्यांत, मानवी प्रयत्नांना कुंठित करणाऱ्या गतकालाच्या अपरिवर्तनीयतेंत एक प्रकारचें पावित्र्य,










मनाला भयचकित करणारें गांभीर्य, तशीच अस्तित्वाच्या विशालतेची, गहनतेची आणि अगम्य गूढाची जाणीव असते व या जाणिवेंतून निर्माण झालेल्या कांहीं विलक्षण दुःखमय बंधांनीं जीवात्मा या विश्वाशीं निगडित होतो. ही नवीन दृष्टि प्राप्त होतांच क्षणिक वासनांची सारी अधीरता नाश पावते, क्षुद्र इच्छांच्या पूर्तीसाठीं धडपडण्याचें आपण सोडून देतों व सामान्य दृष्टीला जीवनांतील सर्वस्व असें वाटणाऱ्या गोष्टींचें महत्त्वहि आपणांला वाटेनासें होतें. ज्याच्या उचंबळणाऱ्या लाटांवर आपण एका क्षुद्र होडग्यांत बसून अल्प काळ नाचून नाहींसे होतों तो जीवनाचा कृष्ण महासागर मानवी सहानुभूतीच्या अंधुक प्रकाशांत आपल्याभोंवतीं पसरलेला आपल्या दृष्टीस पडत असतो; बाहेर पसरलेल्या घोर रात्रीमधून गार वादळी वारे आपल्या निवाऱ्याच्या जागीं वाहत येत असतात. विरोधी शक्तींनीं घेरलेल्या मानवतेच्या असहाय एकलेपणाची खरी जाणीव जीवाला त्या वेळीं होते. कारण आपल्या इच्छांची पर्वा न करणाऱ्या विश्वाच्या सवंध बलाशीं, अंगीं असलेलें सर्व धैर्य एकवटून त्याला सामना द्यावयाचा असतो. कृष्ण शक्तींशीं केलेल्या या झगड्यांत मिळविलेल्या विजयांतून महात्म्यांच्या दिव्य श्रेणींत जीवाला पुनर्जन्म प्राप्त होतो व जीवाला दिपविणारें मानवी जीवनाचें तेजस्वी सौंदर्य प्रथमच दृग्गोचर होतें. बाह्य विश्वाशीं केलेल्या या भीषण संग्रामांतून ज्ञान, विरक्ति आणि दया यांचा उगम होतो व यांच्या जन्मापासून एका नवीन जीवनाला सुरुवात होते. मृत्यु, अस्तित्वाची क्षणभंगुरता, भूतकालाची अपरिवर्तनीयता आणि विश्वाच्या अंध घडामोडींपुढील ,मानवाची दुर्बलता या सर्व शक्तींच्या हातांतील मानव हें एक बाहुलें आहे. पण त्यांची विशालता आकलन करणें व अनुभवणें म्हणजेच त्यांच्यावर विजय मिळविणें होय.

भूतकालाच्या अंगीं जी एक विलक्षण मोहिनी असते त्याचें कारण हेंच होय. शरदृतूंतील मोहक व शुद्ध वातावरणांत आकाशाच्या पार्श्वभूमीवर सोनेरी तेजानें तळपणाऱ्या पक्व पर्णांचें सौंदर्य भूतकालांतील निश्चल व मूक चित्रांत असतें. भूतकाळ बदलत नाहीं किंवा धडपडत नाहीं. संत्रस्त जीवनाची सारी तगमग अनुभवून मग डंकनप्रमाणें तो शांतपणें झोपीं गेलेला असतो. सारी अधीरता व धडपड, जें जें क्षुद्र व क्षणजीवी असतें तें तें त्यांतून लोप पावलेलें असतें व केवळ सुंदर व चिरंतन वस्तू, रात्रीं आकाशांत तारे चमकावे त्याप्रमाणें, त्यांत चमकत असतात. दुबळ्या असमर्थ जीवांना हें सौंदर्य असह्य होतें; पण ज्या आत्म्यानें दैवावर विजय मिळवलेला असतो, त्याला त्याच्यांत धर्माची गुरुकिल्ली आढळते.

निसर्गाच्या शक्तींशीं तुलना करतां मानवाचें बाह्य जीवन केवळ कस्पटासमान आहे. काल, नियति व मृत्यु या सर्व शक्ती त्याच्याहून कितीतरी अधिक बलशाली आहेत व त्याला आधारभूत होणाऱ्या सर्व गोष्टी त्यांच्या भक्ष्यस्थानीं अखेर पडतातच. म्हणून गुलामी वृत्तीनें त्यांची सेवा करणें हेंच मानवाच्या नशिबीं आलें आहे. पण या शक्ती थोर असल्या तरी महात्मतेनें त्यांचें चिंतन करणें व त्यांचें भावरहित शुद्ध सौंदर्य आकलन करणें हें अधिक थोर आहे. अशा चिंतनांतून आपणांला मुक्तीचा लाभ होतो. अनिवार्य भवितव्यतेला आपण शरण जात नाहीं तर तिला आत्मसात् करतों, स्वतःचाच एक अंश बनवतों. वैयक्तिक सुखाची सारी धडपड सोडून देणें, क्षणिक इच्छांची तगमग शांत करणें, केवळ चिरंतन वस्तूंशीं एकजीव होण्याच्या इच्छेनें जळत राहणें, हीच मुक्ति व स्वतंत्र मानवाची हीच खरी आराधना! सर्वशक्तिमान् दैवाच्या चिंतनानें ही मुक्ति प्राप्त होते. आणि कालाच्या सर्वभक्षक अग्नींत ज्याची सारी अशुद्धता जळून खाक झाली आहे अशा मनाला दैवावर विजय मिळवितां येतो.

समान अशा भीषण भवितव्याच्या जाणिवेंतून निर्माण झालेल्या प्रेमबंधनानें विमुक्त मानव सर्व मानवजातीशीं निगडित झालेला असतो व या प्रेमाच्या दिव्य प्रकाशांत त्याचें दैनंदिन जीवन उजळून निघतें. मानवी जीवन म्हणजे काळोख्या रात्रीं, शत्रूंनीं सभोंवार घेरलें असतांना एकाद्या दुर्गम निवासस्थानाकडे शीण व वेदना यांनीं रंजीस येऊन केलेला प्रवास होय! किती थोडे भाग्यशाली








तें निवासस्थान गाठूं शकतात! व त्याचा आसरा टिकतोहि किती अल्प काळ! मृत्यूची अनुल्लंघ्य आज्ञा सुटतांच एकामागून एक आपले सहप्रवासी त्या गर्द काळोखांत चालतां चालतांच गडप होतात! त्यांना साहाय्य करायला किती थोडा काल आपणांला देण्यांत आलेला असतो! सुख, दुःख जें कांहीं ते भोगणार असतील तें सारें या अल्प काळांतच त्यांनीं भोगावयाचें असतें. होय ना? मग उल्हासाचा प्रकाश त्यांच्या मार्गावर पाडणें, सहानुभूतीनें त्यांचा दुःखभार हलका करणें, प्रेमाचा शुद्ध आनंद त्यांना देणें, त्यांचा धीर खचत असेल तेव्हां त्यांना उत्तेजन देणें, आत्यंतिक निराशेच्या काळांत आशेची, श्रद्धेची ज्योत त्यांच्या हृदयांत तेवत ठेवणें हेंच आपल्या हातून घडूं द्या. दुःखांनीं व संकटांनीं जे गांजून गेले आहेत व आपल्याच अंधपणानें जे स्वतःचा नाश करून घेत आहेत त्यांचे गुण व दोष कांटेकोर रीतीनें तोलण्यांत काय अर्थ आहे? त्यांच्या गरजांचाच विचार आपण करूं या. आपल्या बरोबरच ते या काळोखांत धडपडत आहेत. जगाच्या रंगभूमीवर जीवनाच्या महान् दुःखपर्यवसायी नाटकांत आपल्या शोकमय भूमिका ते आपल्याबरोबरच रंगवीत आहेत, याचें स्मरण आपणांला नेहमीं असलें पाहिजे. आणि म्हणून त्यांच्या जीवनावर जेव्हां शेवटचा पडदा पडेल, अक्षय भूतकालांत त्यांच्या चांगुलपणाला व दुष्टपणाला जेव्हां चिरंतन स्थान प्राप्त होईल तेव्हां आपणांला येवढीच जाणीव असूं द्यावी र्की त्यांच्या दुःखांना व अपयशांना आपलीं कृत्यें कधींहि कारणीभूत झालीं नाहींत; येवढेंच काय, पण उलट पक्षीं जेव्हां जेव्हां स्फूर्तीचा दिव्य स्फुलिंग त्यांच्या हृदयांत चेतला होता तेव्हां तेव्हां प्रोत्साहनानें, सहानुभूतीनें, उच्च धैर्यानें व ज्वलंत अशा शब्दांनीं आपण त्यांना साथच दिली. मानवाचें जीवन किती क्षुद्र आणि दुर्बल! त्याच्यावर आणि त्याच्या साऱ्या वंशावर दैवाचा कृष्णकठोर घाला सावकाश पण निश्चितपणें पडणार! चांगलें आणि वाईट यांविषयीं सर्वस्वीं अंध असलेला निसर्ग, विनाशाची पर्वा न करतां आपला मार्ग अप्रतिहत गतीनें चोखाळत असतो. आणि आज आपले जिवलग सहचर एकामागून एक आपणांला सोडून जात असलेले पाहणें हेंच ज्याच्या नशिबीं लिहिलेलें आहे व उद्यां ज्याला स्वतःलाच मृत्यूच्या अंधारांत शिरावयाचें आहे तो मानव अधिक तें काय करणार? मृत्यूचा घाला अखेरीस पडण्यापूर्वीं आपल्या अल्प आयुष्याला उन्नत करणारे विचार जतन करणें, दैवाला शरण जाणाऱ्या गुलामाच्या भीतींना तुच्छ गणून आपल्याच हातांनीं बांधलेल्या मंदिरांत आपल्या ध्येयांची पूजा करणें, अचेतन शक्तींच्या अफाट साम्राज्याच्या विस्तारानें गांगरून न जातां आपल्या बाह्य जीवनावर अंमल चालविणाऱ्या शक्तींपासून आपल्या मनाचें स्वातंत्र्य कायम राखणें व आपलें ज्ञान आणि आपला धिक्कार केवळ कांहीं क्षण चालू देऊन तो सहन करणाऱ्या आजिंक्य शक्तीपुढें विनम्र न होतां, जड विश्वाच्या विरोधाला न जुमानतां आपल्या ध्येयांनीं निर्माण केलेली सृष्टि केवळ आपल्या एकट्याच्याच श्रांत खांद्यांवरून वाहून नेणें येवढेंच काय तें त्याच्या हातीं आहे.

---

## खरें स्वराज्य

खरें स्वराज्य म्हणजे कांहीं थोड्यांनींच आपल्या हातांत अधिकार घेणें नव्हे. जेव्हां अधिकाराचा दुरुपयोग होतो तेव्हां त्या अधिकाराचा प्रतिकार करायचें सर्व लोकांना सामर्थ्य येणें म्हणजे खरें स्वराज्य होय. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें झालें तर सत्तेला कह्यांत ठेवून तिचें नियमन करण्याच्या सामर्थ्याची जाणीव जनतेला शिक्षणानें करून देणें म्हणजे खरें स्वराज्य होय.

—महात्मा गांधी, 'यंग इंडिया', २९ जानेवारी १९२५.








# साहित्याचें तात्पर्य

गु. रवीन्द्रनाथ ठाकूर [ अनुवादिका :--- प्रा. सौ. सिंधु जोशी. ]

## बाहेरील जग आणि मानवाचें जग

* बाहेरील जगानें आपल्या मनांत प्रवेश केल्यानंतर तें एक निराळ्या प्रकारचें जग होऊन जातें. त्यामध्यें बाहेरील जगांतील केवळ रंग, आकृति, ध्वनि इत्यादि असतात असें नाहीं तर त्यांबरोबरच आपले बरेवाईट विचार, भयविस्मय, सुखदुःख हींहि जोडलेलीं असतात. आपल्या हृदयवृत्तीच्या विविध रसांमध्यें तें जग अनेक प्रकारें व्यक्त होतें.

आपल्या या हृदयवृत्तीच्या रसांत बाहेरच्या जगाला माखून काढून आपण त्याला एका नवीन स्वरूपांत निर्माण करीत असतों.

ज्याप्रमाणें कित्येकांच्या जठरांत पाचक रस योग्य प्रमाणांत नसल्यामुळें त्यांना बाहेरचे खाद्य पदार्थ आपल्या समग्र शरीरांत मिसळून टाकतां येत नाहींत, त्याचप्रमाणें ज्यांना आपल्या हृदयवृत्तीच्या पाचक रसाचा भरपूर प्रमाणांत जगावर प्रयोग करतां येत नाहीं ते बाहेरील जगाला आंतलें जग, आपलें जग, मनुष्याचें जग बनवूं शकत नाहींत.

कांहीं असे जडप्रकृतीचे लोक असतात कीं, त्यांच्या हृदयाला अत्यंत अल्प विषयांचेंच औत्सुक्य असतें. असे लोक जगांत जन्म घेऊनहि अधिकांश जगापासून वंचित झालेले असतात. त्यांच्या हृदयाचीं गवाक्षें संख्येनें थोडीं आणि विस्तारानें संकुचित असल्यामुळें या विश्वामध्यें ते प्रवासी झाले आहेत.

कांहीं असे भाग्यशाली लोकहि आहेत कीं ज्यांचा विस्मय, ज्यांचें प्रेम आणि ज्यांची कल्पना सर्वत्र जागृत असतात. निसर्गाच्या कोनाकोपऱ्यांतून त्यांना निमंत्रण लाभतें. मानवी संसारांतील विविध आंदोलनांमुळें त्यांच्या चित्तवीणेवर विविध रागिण्यांचे झंकार उमटतात.

यांच्या मनांमध्यें बाहेरील विश्व हृदयवृत्तीच्या विविध रसांत, विविध रंगांत व विविध ठशांत विविध प्रकारें निर्माण होतें.

भावनाशील मनांतील हें जग बाहेरील जगाहून माणसाला अधिक जवळचें असतें. एका हृदयाच्या साहाय्यानें दुसऱ्या हृदयासाठीं तें सुगम होतें. आपल्या चित्ताच्या प्रभावानें तें जग जें विशेषत्व मिळवितें त्या(विशेषत्वा)मुळेंच तें सर्वांहून जास्त उपभोग्य बनतें.

यावरून असें दिसतें कीं बाहेरील जग आणि मानवाचें जग यांमध्यें एक मोठा फरक आहे. कोणती वस्तु पांढरी आहे, कोणती काळी आहे, कोणती मोठी आहे, कोणती लहान आहे, एवढीच माहिती मानवाचें जग देत नाहीं. तर कोणती वस्तु प्रिय आहे, कोणती अप्रिय आहे, कोणती सुंदर आहे, कोणती सुंदर नाहीं, कोणती चांगली आहे, कोणती वाईट आहे, यांविषयींहि मानवाचें जग अनेक प्रकारें माहिती सांगत असतें.

---

* गु. रवींद्रनाथांच्या " साहित्य " नांवाच्या ग्रंथांतील पहिल्या निबंधाचा मूळ बंगालीवरून शब्दशः अनुवाद.









# साहित्याचें तात्पर्य

## हृदय व्यक्त होण्याकरितां व्याकुल

हें जें मानवाचें जग आहे तें आपल्या हृदया-हृदयांतून वाहत आलें आहे. हा प्रवाह पुरातन तसाच नित्यनूतन आहे. नवीं नवीं इंद्रियें आणि नवीं नवीं हृदयें यांमधून वाहून हा सनातन स्रोत चिरदिन नवीन बनून चालला आहे.

परंतु हा कशा प्रकारें मिळवावयाचा ? त्याला कोणत्या उपायानें धरून ठेवावयाचें ? या अपूर्व मानस-जगताला रूप देऊन पुनः जर बाहेर प्रकाशित करतां आलें नाहीं तर तें चिरदिन निर्माण होईल आणि चिरदिन नष्ट होत जाईल.

परंतु हा पदार्थ नष्ट होऊं इच्छीत नाहीं. हृदयाचें जग स्वतःला व्यक्त करण्यासाठीं व्याकुळ असतें. म्हणून चिरकालापासून मनुष्यांमध्यें साहित्याचा आवेग दिसून येतो.

साहित्याचा विचार करतेवेळीं दोन गोष्टी पाहिल्या पाहिजेत. एक, विश्वावर साहित्यकाराच्या हृदयाचा अधिकार किती आहे हीं व दुसरी, तें स्थायी स्वरूपांत कितपत व्यक्त होतें हीं.

प्रत्येक वेळीं या दोहोंमध्यें सामंजस्य (सुसंवाद) असत नाहीं. ज्या वेळीं तें असतें त्या वेळीं सुवर्णाला उजळा दिल्यासारखें वाटतें.

कवीचें कल्पनासचेतन हृदय जितकें विश्वव्यापी, तितकी त्याच्या रचनेच्या गंभीरतेनें आपली परितृप्ति. याप्रमाणें मानवजगताची सीमा विस्तारित होऊन आपलें चिरंतन विहारक्षेत्र विपुल होतें.

परंतु रचनाशक्तीचें नैपुण्यहि साहित्यांत फार मूल्यवान् आहे. कारण ज्याचें अवलंबन करून ती शक्ति प्रकट होते, तें तुलनेनें जरी तुच्छ असलें तरी ती शक्ति एकदम नष्ट होत नाहीं. ती शक्ति भाषेंत, साहित्यांत एकत्र होत जाते. याप्रमाणें मानवाची प्रकटीकरणाची शक्ति वाढत जाते. या शक्तीच्या प्राप्तीसाठीं मनुष्य नेहमीं व्याकुळ असतो. ज्या कृतींच्या साहाय्यानें मनुष्याची ही शक्ति परिपुष्ट होत जाते त्यांना यशस्वी करून ऋण फेडण्याचा प्रयत्न मनुष्य करीत असतो.

## स्त्रीमध्यें लावण्य व लज्जा; साहित्यांत अनिर्वचनीयता

जें मानसजगत् हृदयभावनांच्या साधनानें अंतरांत निर्माण होतें तें बाहेर प्रकट करण्याचा उपाय कोणता ?

त्याला अशा रीतीनें प्रकाशित केलें पाहिजे कीं, त्यामुळें हृदयाचा भाव उत्तेजित होईल.

आणि हृदयाच्या भावांचा उद्रेक करण्यास अनेक प्रकारची साधनसामग्री लागते.

पुरुषवर्गाचा ऑफिसांतील पोषाख साधा असतो. तो जितका साधा असतो तितकाच कामाला उपयोगी असतो. स्त्रियांची वेषभूषा, त्यांचे लज्जा-विनय व अंगविन्यास हीं सर्व सुधारलेल्या समाजांतहि प्रचलित आहेत.

स्त्रियांचें कार्य हृदयाचें कार्य आहे. त्यांना हृदय द्यावयाचें असतें आणि हृदय आकर्षितहि करावयाचें असतें. म्हणून अगदी सरळ, साधेंसुधें, तोकडें असलेलें त्यांना चालत नाहीं. यथायोग्य असणें हें पुरुषांना आवश्यक असतें; पण सुंदर असणेंच स्त्रियांना हवें असतें. पुरुषांचे व्यवहार बहुतांशीं सुस्पष्ट असतील तरच उत्तम; पण स्त्रियांच्या व्यवहारांत अनेक आवरणें, आभास, इंगितें असलीं पाहिजेत.

साहित्यहि आपले प्रयत्न सफळ करण्यासाठीं अलंकारांचा, रूपकांचा, छंदांचा आभास व इंगितांचा आश्रय घेतें. तत्त्वज्ञान-विज्ञानांप्रमाणें निरलंकारी असणें त्याला चालणार नाहीं.

अपरूपाला रूपाच्या द्वारा व्यक्त करतांना शब्दांमध्यें अनिर्वचनीयतेचें रक्षण करावें लागतें. स्त्रीमध्यें ज्याप्रमाणें लावण्य व लज्जा हीं असतात, त्याप्रमाणेंच साहित्यांत अनिर्वचनीयता असते. ती अनुकरणाच्या अतीत असते. ती अलंकारांच्याहि पलीकडे असते, अलंकारांनीं झांकली जात नाहीं.

## चित्र आणि संगीत

या भाषातीताला भाषेमध्यें प्रस्थापित करण्यासाठीं साहित्य मुख्यत्वें दोन गोष्टी भाषेंत मिश्रित करतें: चित्र आणि संगीत.

वाणीच्या द्वारा जें बोलून दाखवितां येणार नाहीं तें चित्रद्वारा व्यक्त होतें. साहित्यामध्यें या चित्र








रेखाटण्याच्या पद्धतीस सीमा नाहीं. उपमा, तुलना, रूपक यांच्या द्वारा भाव मूर्त होऊं इच्छितात. " देखिबारे आँखिपांखि धाय " ( 'पाहण्यासाठीं नेत्रपक्षी धांवत आहे ' ) या एका गोष्टींत बलरामदासानें काय सांगितलें नाहीं? व्याकुल दृष्टीची व्याकुलता केवळ वर्णनानें कशी व्यक्त होईल? दृष्टि जणूं पक्ष्याप्रमाणें उडून जाऊं पाहत आहे. चित्रामध्यें प्रकाशित होण्यामुळें अत्यंत व्याकुलता एका क्षणांत शांत होते.

याशिवाय छंदांत, शब्दांत, वाक्यविन्यासांत साहित्याला संगीताचा आश्रय घ्यावाच लागतो. जें कोणत्याहि रीतीनें व्यक्त होणें शक्य नाहीं तें संगीतद्वाराच व्यक्त होतें. अर्थविश्लेषण केल्यानें जी गोष्ट सामान्य वाटते ती संगीताच्या द्वाराच असामान्य बनते. हें संगीतच वाणीमध्यें वेदनेचा संचार करतें.

म्हणूनच चित्र आणि संगीत हीं साहित्याचीं प्रधान उपकरणें आहेत. चित्र भावाला आकार देतें आणि संगीत त्याला गति देतें. चित्र देह आहे आणि संगीत प्राण आहे.

## मानवचरित्र

परंतु मानवाचें हृदय हीच साहित्याला पकडून ठेवण्याची वस्तु आहे असें नाहीं. मानवाचें चरित्र देखील अशी एक वस्तु आहे कीं, जी जड सृष्टीप्रमाणें आपल्या इंद्रियांच्या द्वारें हस्तगत होत नाहीं. तिला स्थिर राहावयाचा हुकूम करून स्थिर ठेवतां येणार नाहीं. तो मनुष्याला अत्यंत औत्सुक्यजनक असा एक पदार्थ आहे. परंतु पशुशाळेंतील पशूंप्रमाणें पिंजऱ्यांत ठेवून निरीक्षण करण्याइतकें तें कांहीं सोपें काम नाहीं.

सर्व बंधनांच्या पलीकडे असणाऱ्या या विस्मयकारक मानवचरित्राला साहित्य त्याच्या अंतर्लोकांतून बाहेर आणूं पाहतें. हें अत्यंत अवघड काम आहे; कारण मानवचरित्र स्थिर नसतें, सुसंगत नसतें. त्याचे अनेक अंश आहेत, अनेक थर आहेत. त्यांमध्यें निर्वेधपणें ये-जा करणें सोपें नाहीं. शिवाय त्याची लीला इतकी सूक्ष्म, इतकी अचिंतनीय, इतकी आकस्मिक आहे कीं, तीं पूर्णपणें हृदयगम्य करणें हें एकाद्या असाधारण शक्तीचें कार्य आहे. व्यास, वाल्मीकि, कालिदास वगैरे हें कार्य करीत आले आहेत.

तेव्हां हा समस्त आलोच्य विषय थोडक्यांत सांगावयाचा झाला तर असें म्हणतां येईल कीं साहित्याचा विषय मानवचरित्र आणि मानवहृदय आहे.

परंतु ' मानवचरित्र ' असें म्हणण्यानें जणूं कांहीं तरी जास्त बोललें गेलें! वस्तुतः बाह्यप्रकृति आणि मानवचरित्र मनुष्याच्या हृदयांत क्षणोक्षणीं जो आकार धारण करतात, जें संगीत ध्वनित करतात, तेंच भाषेंत रचलेलें चित्र आणि तेंच गीत म्हणजे साहित्य होय.

## साहित्य ही एक दैववाणी

परमेश्वराचा आनंद निसर्गांत आणि मानवचरित्रांत आपल्याआपण आपलीच निर्मिति करीत असतो. मानवहृदयहि साहित्यांत स्वतःची निर्मिति करावयास म्हणजेच स्वतःला व्यक्त करावयासाठीं प्रयत्न करीत असतें. या प्रयत्नाला अंत नसतो ही आश्चर्याची गोष्ट! कवी मानवहृदयाच्या या चिरंतन प्रयत्नाचें निमित्तमात्र होत.

परमेश्वराची आनंदसृष्टि स्वतः निर्माण होऊन स्वतःच विलीन होते. मानवहृदयाची आनंदसृष्टि तिचाच प्रतिध्वनि आहे. या चराचर सृष्टीच्या आनंदगीताचा झंकार आपल्या हृदयवीणेच्या तारेला नेहमी स्पंदित करीत असतो. हें जें मानससंगीत, परमेश्वराच्या सृष्टीच्या प्रतिघातानें आपल्या अंतरात्म्यांत उत्पन्न झालेला हा जो सृष्टीचा आवेग त्याचाच विकास साहित्य होय. विश्वाचा निःश्वास आपल्या चित्तवांसरीवर जी रागिणी वाजवीत आहे, तीच स्पष्टपणें प्रकट करण्याचा प्रयत्न साहित्य करीत असतें. साहित्य कोठल्याहि व्यक्तीचें नसतें, तें रचणाऱ्याचेंहि नसतें; साहित्य ही एक दैववाणी होय. बहिःसृष्टि ज्याप्रमाणें स्वतःला बऱ्यावाईट बाजू व अपूर्णता असूनहि चिरकालापासून व्यक्त होण्यासाठीं प्रयत्न करीतच आहे, त्याचप्रमाणें ही वाणीहि प्रत्येक देशांत व प्रत्येक भाषेंत आपल्या अंतरामधून बाहेर व्यक्त होण्यासाठीं निरंतर प्रयत्न करीत आहे.

---








# प्रौढ-शिक्षणाचें साध्य

श्री. के. जी. सैयिदेन

## गंभीर परिस्थिति

देशामध्यें आपणांसमोर अत्यंत निर्वाणीची विकट परिस्थिति असून तिला तोंड द्यावयाला आपला सर्व वेळ व आपली सर्व शक्ति आपण वेंचलीं पाहिजेत. गेल्या कांहीं महिन्यांत ज्या कांहीं वऱ्या-वाईट गोष्टी घडून आल्या त्यांमुळें प्रौढ-शिक्षणाच्या प्रश्नाचा नूर अजीबात पालटून गेला आहे. प्रौढ-शिक्षणाचें महत्त्व किती आहे, राष्ट्रभर प्रौढ-शिक्षणाचा कार्यक्रम अंमलांत आणल्याशिवाय स्वतंत्र आणि प्रगतिपर असें सरकार निर्माण करणें किंवा लोकांची आर्थिक आणि सामाजिक स्थिति सुधारणें कसें अशक्य आहे याची आपणांला परवांपरवांपर्यंत सर्वसाधारणपणें जाणीव होती, नाहीं असें नाहीं. आपण तत्कालीन सरकारवर त्याचप्रमाणें बिन-सरकारी संस्थांवरहि त्यांच्या नालायकपणाबद्दल कसे जळफळत आणि चिडत होतों! परंतु नुकत्याच गेल्या कांहीं महिन्यांत अशा कांहीं प्रचंड घटना घडून आल्या आहेत कीं, त्यांमुळें आपल्यापुढील कामाला निराळीच कलाटणी मिळाली आहे. त्या प्रचंड घटना एकाद्या आकस्मिक धरणी-कंपामुळें किंवा ज्वालामुखीच्या स्फोटामुळें जसें जीवन हादरून जावें, तसा परिणाम आपल्या जीवनावर करीत आहेत. ही केवळ दिखाऊ व अलंकारिक भाषा म्हणून वापरलेली नसून, तीमुळें त्या घटनांचें मूळ आणि खरें स्वरूप स्पष्ट दिसून येतात. बेसावध आणि मंदबुद्धीच्या माणसांना ज्वालामुखीचा स्फोट किंवा धरणीकंप हें एक अनाकलनीय आणि अनपेक्षित असें गूढ आहे, सृष्टीची ती एक विक्षिप्त लहर आहे, असें वाटत असतें. आपल्या या अज्ञानाच्या सुखांत ते बिचारे मूढ लोक रममाण होऊन फसवी शांति धारण करणाऱ्या ज्वालामुखी पर्वताच्या आसऱ्यानें आपापल्या व्यवहारांत चूर असतात! त्या पर्वताची वरवर दिसणारी रमणीय सृष्टिशोभा त्यांना खरोखरींच मनोहर वाटते; त्या ज्वालामुखीखालीं भूमीच्या उदरांत घोर संहारक अशा शक्ती निर्घृणपणें एकीमागून एक रसरसून तयार होत असून स्फोटाची वाट पाहत आहेत, हें त्या बिचाऱ्यांच्या ध्यानींमनींहि नसतें! त्यांना काय कल्पना कीं, लवकरच धरणीच्या जठरांत आगीचा डोंब उठणार, भूमिगर्भांतील खडक, धोंडे आणि धातू त्या आगींत वितळून त्यांचा तप्त रस होणार, पाण्याची वाफ होऊन ती 'सूंसूं' करूं लागणार, या सर्व बाहेर पडणाऱ्या शक्तींना आंवरावयास धरणीचा पापुद्रा असमर्थ ठरून शेवटीं भंगणार, असा अनुकूल मार्ग मिळतांच आंतून धुराचे लोट, तप्त रसाचे स्रोत आणि जळत्या दगडाचे ढीग उफाळून बाहेर पडणार आणि कांहींहि दयामाया न ठेवितां पुरुष, स्त्रिया, मुलें, या सर्वांची राखरांगोळी करून टाकणार! त्यांच्या सुंदर संस्कृतीनें निर्माण केलेल्या गोष्टींचा नायनाट होऊन मागमूसहि राहणार नाहीं! हा सर्वनाश झाल्यावर मग हे मूढ कुरकूर करावयाला लागतील कीं, "कां हो, या अरिष्टाची अगदीं कांहींच कशी पूर्वसूचना मिळाली नव्हती?" जणूं काय हे निसर्गाचे उत्पात म्हणजे विधिमंडळाच्या सभांतील विचारलेले प्रश्नच,

---

१ मुंबई सरकारचे शिक्षणविषयक सल्लागार श्री. के. जी. सैयिदेन यांनीं रेवा संस्थानांत पांचव्या अखिल-भारतीय-शिक्षणपरिषदेसमोर जें इंग्रजींत भाषण केलें, त्याचा प्रस्तुत लेख हा अनुवाद आहे.
— का. सं.








कीं ज्यांची अगदीं अदबीनें ठराविक वेळीं पूर्व-सूचना दिलीच पाहिजे!

अलीकडे हिंदुस्थानांत असाच प्रकार घडून आला आहे. पहिली गोष्ट म्हणजे आपणांला जें स्वातंत्र्य मिळालें तें यंदांच आपण विशेष, कांहीं झगझगीत करून दाखविलें त्यामुळें मिळालें असें नव्हे, तर गेलीं साठ वर्षें जो राजकीय झगडा दीर्घकाळपर्यंत चालला आणि ज्याला पहिल्या महायुद्धानंतर जोराची चालना मिळाली त्या राजकीय झगड्याचा तो परिणाम आहे. अर्थात् आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत घडून आलेल्या घडामोडींनीं या स्वातंत्र्य–संपादनाच्या प्रक्रियेस जोराची गति दिली असली—ज्वालामुखीच्या स्फोटापूर्वी तरी त्या ज्वालामुखीचा स्तर नरम झालेला असतोच ना?—तरी पण मुद्द्याची गोष्ट ही कीं आपण संपादिलेलें स्वातंत्र्य हें औत्पातिक किंवा अनपेक्षित नसून ज्या कांहीं राजकीय व सामाजिक शक्ती दीर्घकालपर्यंत काम करीत होत्या त्यांचाच तो परिपाक आहे. उलट पक्षीं, स्वातंत्र्याबरोबरच आलेल्या मोठ्या जबाबदाऱ्या अंगावर घेण्यास आपली नैतिक आणि मानसिक दृष्ट्या तयारी नाहीं असें आढळून आलें आहे. राजकीय चळवळींमधून आपणांला बरेंच शिक्षण मिळालें हें खरें; पण तें शिक्षण युद्धतंत्राचें—आणि तें युद्ध प्रामुख्यानें अहिंसात्मक असलें तरी तें युद्धच होतें—होतें. परंतु आतां आपणांकडे सत्तासंक्रमण झाल्यामुळें तंत्र बदलण्याची वेळ आली आहे, 'अमकें वाईट, प्रतिगामी, दडपशाहीचें' अशी नुसती टीका करण्याऐवजीं समाजाला हितकर असें कांहीं चांगलें विधायक कार्य करून दाखविण्याचा प्रसंग येऊन ठेपला आहे; लोकशाही आणि सामाजिक न्याय यांवर अधिष्ठित अशी समाजरचना निर्माण करण्याची सुसंधि आली आहे. अशा वेळीं पूर्वीपेक्षां वेगळ्या गरजा आणि वेगळे प्रश्न उपस्थित झाल्यामुळें निराळ्या गुणांची आणि मनोवृत्तींची आवश्यकता निर्माण झाली आहे. स्वतंत्र राष्ट्र म्हणून नुकताच ज्याचा पुनर्जन्म झाला आहे, असा हा आपला प्राचीन वैभवशाली देश जर पुढें टिकून राहावयाला पाहिजे असेल—कारण, निर्घृण काळ कोणाच्या खुषीची वा सोयीची वाट पाहत बसत नाहीं—तर आपण अविलंबानें व निर्भयपणानें मूलगामी उपायांचा अवलंब केला पाहिजे, आवश्यक असें बौद्धिक आणि भावनामय वातावरण निर्माण केलें पाहिजे आणि न्याय्य अशा सामाजिक आणि नैतिक कर्तव्यांच्या हांकेला 'ओ' द्यावयाची संवय लावून घेतली पाहिजे. समाजाच्या ध्येयांना इष्ट तें वळण लावण्याच्या कामीं शिक्षण ही एक प्रभावी व हेतुपूर्ण शक्ति आहे यांत शंका नाहीं. परंतु शाळा–कॉलेजांमधून दिल्या जाणाऱ्या गतानुगतिक शिक्षण–पद्धतीवरच जर आपण विसंबून राहिलों तर, कांहीं परिणाम झाला आहे असें कळून यावयाला खूप अवधि—निदान एका पिढीइतका तरी अवधि लागेल.

म्हणूनच प्रौढ–शिक्षणाला—अत्यंत व्यापक व सुसंस्कृत अर्थी प्रौढ–शिक्षणाला—राष्ट्रीय विचारसरणि आणि चारित्र्य बनविण्याची ही एक मोठी अमूल्य संधि आली आहे. ...जर आपणांला कामचलाऊ कां होईना पण लोकसत्ताक समाजव्यवस्था निर्माण करावयाची असेल तर त्या समाजव्यवस्थेमध्यें ज्या बहुसंख्याक समाजाच्या इच्छा प्रभावी राहणार, त्या समाजाच्या इच्छा–आकांक्षा डोळस (बुद्धिनिष्ठ), सुसंस्कृत, सुष्ट आणि सत्प्रवृत्तिप्रेरित असाव्या याबद्दल शाश्वती निर्माण करणें अवश्य नाहीं काय? अशिक्षित लोकशाहीपासून, माथेफिरूपणा आणि विकारवशता यांच्या आहारीं केव्हां जाईल याचा नेम नसणाऱ्या लोकशाहीपासून स्वार्थी व संधिसाधु पुढाऱ्यांच्या पाताळयंत्री कारस्थानांना बळी पडणाऱ्या अशा लोकशाहीपासून शांतता, सुरक्षितता आणि सुख ह्यांना जेवढें भय आहे, तेवढें कोणत्याहि स्वरूपाच्या शासनपद्धतीपासून नसेल! असें म्हणण्यांत लोकशाहीला कमी लेखण्याचा हेतु नाहीं, तर लोकशाहीचा जो बौद्धिक आणि नैतिक गाभा आहे त्याचा अधःपात टाळावा हा आहे.

## लोकशाहीसाठीं शिक्षण

लोकशाहीला दोन मोठ्या धोक्यांपासून भय आहे. एक धोका म्हणजे कोणताहि प्रचार सत्य म्हणून स्वीकारण्याची अविवेकी आणि भाबडी वृत्ति आणि दुसरा धोका म्हणजे सामाजिक ऐक्याची जाणीव नष्ट होणें हा होय. सामाजिक ऐक्यबुद्धि नष्ट होण्याचा



अनुक्रमणिका






परिणाम म्हणजे स्वार्थांध हितसंबंधांमुळें होणारे झगडे आणि निरनिराळ्या जातीय, पंथीय आणि प्रांतीय अशा गटांमध्यें मारामाऱ्या सुरू होऊन शेवटीं होणारा आत्मघात. या दोन धोक्यांविरुद्ध लोकशाहीजवळचीं बचावाचीं बौद्धिक आणि नैतिक साधनें मजबूत करणें हें लोकशाहीसाठीं शिक्षण देणारांचें प्रमुख कर्तव्य होय. आपल्या देशांत राजकीय स्वातंत्र्य आणि लोकशाही संस्था यांचा नुकताच उदय झाला असून, त्यामुळें जनतेचें पद-सिद्ध (ex-officio) महत्त्व अधिकच वाढलें आहे. राजकीय महत्त्व आणि सत्ता प्राप्त करून घेण्याकरितां सत्तालोलुप दुर्जन त्याचप्रमाणें निःस्पृह सज्जन अशा दोघांनाहि जनतेचीं मतें मागणें प्राप्त आहे. जनतेचीं मतें आणि तिचा पाठिंबा मिळविण्याच्या दोन रीती आहेत. एक रीत म्हणजे जनतेचा सांस्कृतिक आणि आर्थिक दर्जा वाढविण्याच्या दृष्टीनें तिची गाजावाजा न करतां सहिष्णुतेनें व तत्परतेनें केलेली सेवा. दुसरी रीत म्हणजे लोकांच्या अज्ञानाचा आणि अज्ञानाशीं संबद्ध अशा त्यांच्या विकृत मनोग्रहांचा आपल्या स्वार्थाकरितां उपयोग करून घेणें. पहिला मार्ग हा दुर्गम आणि चढणीचा असून उच्च नीतिमत्तेचीं व निःस्वार्थी अशींच माणसें त्या मार्गानें जातात. दुसरा मार्ग सोपा पण उतरणीवरचा असून त्यावरून नैतिक अधःपाताची घसरगुंडीहि मोठ्या जोरानें होऊं शकते! हा दुसरा मार्ग महत्त्वाकांक्षी आणि आक्रमक वृत्तीच्या माण-सांना स्वाभाविकच पसंत असतो. या दोन मार्गांनीं जाणाऱ्या माणसांमध्यें मुख्य फरक म्हणजे, पहिला मार्ग स्वीकारणारीं माणसें जनतेला आपलें 'साध्य' मानतात, 'जनतेला आपण सुसंस्कृत जीवनाचा लाभ करून दिला पाहिजे व तिची स्नेहानें काळजी घेतली पाहिजे' यावर त्यांचा कटाक्ष असतो; तर दुसऱ्या मार्गाचा स्वीकार करणारीं माणसें "जनता हें केवळ आपल्या स्वार्थाचें, आपणांस राजकारणांत सत्ता आणि वजन मिळविण्याचें एक साधन आहे" असें मानतात. लोकशाहीमध्यें या दोन प्रकारच्या वृत्तींच्या माणसांत नेहमींच विरोध असतो. कोणत्या वृत्तीचा पक्ष विजयी होऊन लोकांचा विश्वास संपादन करतो यावर लोकशाहीचें भवितव्य अवलंबून असतें.

## प्रौढ–शिक्षणाचा अर्थ

सामाजिक आणि नागरिक शिक्षणाचा एक प्रमुख उद्देश म्हणजे लोकांची विवेकबुद्धि वाढविणें हा होय. त्या योगानें त्यांना स्वार्थसाधु कोण आणि खरे समाज-सेवक कोण हें, तद्वतच मानवांतील पाशवी वृत्ति उत्ते-जित करणारा माथेफिरूपणा कोणता आणि दैवी वृत्तीला आवाहन देऊन तिचा सर्वोत्कर्ष करणारें सभ्यत्व आणि सत्य कोणतें यांमधला फरक जाणतां येईल. आज हा प्रश्न प्रौढ–शिक्षणामध्यें प्रमुख होऊन बसला आहे. कारण, जनताप्रचाराच्या नवनवीन वाढत्या प्रभावी साधनांनीं विचारस्वातंत्र्य व विवेकस्वातंत्र्य नष्ट होण्याची आणि प्रस्थापित हितसंबंधांनीं कोट्यवधि लोकांच्या मनावर ठोकळेबाज विचारसरणि बिंबविण्याची शक्यता उत्पन्न होण्याची भीति उत्पन्न झाली आहे. लोकांना वाचाव-याला शिकविणें—कांहीं लिखित प्रतीकांचा उच्चार आणि अर्थ करावयास शिकविणें—हा प्रौढशिक्षणाचा एक उद्देश असतो; परंतु असें वाचावयाचें सामर्थ्य माणसांच्या अंगीं येतें न येतें तोंच टपून बसलेलीं वर्तमानपत्रें आणि नियतकालिकें त्या विचाऱ्यांवर तुटून पडतात! या वृत्तसाहित्योत्पादकांपैकीं बऱ्याच जणांचा धंदा सत्य आणि सुहृद्भाव प्रसृत करण्या-ऐवजीं द्वेष आणि असत्य पसरविणें हाच असतो. म्हणूनच वाचतां येणाऱ्या माणसाचा प्रवेश ग्रंथाच्या विश्वांत होत असला, तरी ज्ञानाच्या पवित्र प्रदेशांत होतोच असें नाहीं. त्याच्या फावल्या वेळापैकीं बरा-चसा भाग बौद्धिक आणि कलात्मक दृष्ट्या हिणकस वाङ्मय वाचण्यांत जातो. विज्ञानानें आपणांला नभो-वाणी, चित्रपट, बोलपट या साधनांची अपूर्व देणगी दिली आहे. आणि या साधनांनीं जगभर कोट्यवधि लोकांच्या कानांवर आणि डोळ्यांवर असा कांहीं 'न भूतो न भविष्यति' भडिमार चालविला आहे कीं, त्याला सीमाच नाहीं! भाषणें, गाणीं, कथा, नाटकें, प्रहसनें, इतर माहिती यांनीं मारे आपल्यावर गर्दी करून सोडली आहे! परंतु आपली सहानुभूति, विवेक आणि भावना यांना समृद्ध करण्याचें व आपल्या कलात्मक अभिरुचीला इष्ट वळण लावण्याचें सामर्थ्य ज्यांत आहे, अशा साहित्याचें प्रमाण या एकंदर साहित्यांत किती अल्प आहे! बहुतेकांचा








उद्देश लोकांची हीन तऱ्हेची करमणूक करणें आणि जितक्या लवकर आणि जितक्या सोप्या रीतीनें पैसा उकळतां येईल तितक्या लवकर व तितक्या सोप्या रीतीनें पैसा—विटाळलेला पैसा उकळणें हाच असतो. या सर्व शक्तींच्या प्रचंड संघटनेविरुद्ध तोंड देण्यास आपणांजवळ शिक्षणाशिवाय दुसरें कोणतेंहि साधन नाहीं. आणि तेंहि शिक्षण बिचारें उपेक्षित, उपासमार झालेलें व ज्याला कोणी पुसत नाहीं असें ! भयंकर दैत्यांच्याविरुद्ध सामना द्यावयाची पाळी या जरत्कारूवर आली आहे ! सकृद्दर्शनीं अशी परिस्थिति दिसते खरी; पण थोडा विचार करतां शिक्षणाची योजना जर आपण अधिक व्यापक आणि औदार्यपूर्ण रीत्या केली तर त्यायोगानें लोकांस विचार करावयास, सत्य कोणतें आणि असत्य कोणतें हें हुडकून काढण्यास आणि राजकीय वा व्यापारी प्रचाराबरोबर वाहवून न जाण्यास शिकविणें कां शक्य होऊं नये ? अलबत् हें शक्य आहे. लोकांना हेंहि पटवून देतां येणें शक्य आहे कीं, मानवां–मानवांमधील संबंध इतके पवित्र आणि जिव्हाळ्याचे आहेत कीं, कोणाहि उपद्व्यापी घटिंगणाच्या लहरीनें त्यांत भंग होणें शक्य नाहीं. आज राज्यकारभाराचीं सूत्रें सत्प्रवृत्त आणि प्रगतिमान् अशा राष्ट्रीय सरकारच्या हातीं असतांना हें कां शक्य होऊं नये ? या जरत्कारूच्या अंगीं भिमाचें अचाट सामर्थ्य कां उत्पन्न होऊं नये ? हेंच दुसऱ्या शब्दांत सांगावयाचे म्हणजे शाळा, नभोवाणी, चित्र–बोलपट, नाट्यगृहें, वृत्तसाहित्य या सगळ्या गोष्टी एकाच मोठ्या शैक्षणिक आणि सांस्कृतिक अशा साधनाचे, एकमेकांना पूरक, लोकांचें जीवन समृद्ध करणारे, त्यांच्या कलात्मक, बौद्धिक, सामाजिक आणि नैतिक अभिरुचींना वळण लावणारे घटक कां होऊं नयेत ? कोट्यवधि लोकांवर ज्या नाना गोष्टींचे परिणाम घडून येत आहेत त्यांचा विवेकपूर्वक समन्वय करून त्यांत सुसंगति आणल्याशिवाय लोकांना खरें उपयुक्त शिक्षण देणें किंवा त्यांच्या बौद्धिक व भावनात्मक वृत्तींत कायम टिकणारा असा महत्त्वाचा बदल घडवून आणणें शक्य नाहीं.

## अलीकडील हाहाकार

आपल्या देशाच्या परिस्थितींत गेल्या कांहीं महिन्यांपूर्वीं जें मोठें परिवर्तन घडून आलें, स्वातंत्र्याचा जो आम्हांला लाभ झाला, त्याच्या एका बाजूचें दिग्दर्शन प्रौढ–शिक्षणाच्या दृष्टीनें वर केलें आहे. ही गोष्ट येवढ्यापुरतीच असती, तर सर्वत्र आबादीआबाद मानावयाला व आशा बाळगावयाला हरकत नव्हती. एका महान् प्राचीन राष्ट्राला शंभर वर्षांच्या राजकीय संग्रामानंतर आपलें स्वत्व परत मिळालें आहे, त्याच्या समोर आकर्षक असा भविष्यकाळ उभा आहे व आपल्या मनाप्रमाणें तो भविष्यकाळ घडवावयाची संधीहि आहे ! पण गोष्ट येवढीच नाहीं; या स्वातंत्र्याला उदयकालींच खून, लूटमार आणि विनाश यांच्या हाहाकारानें–लाजिरवाण्या अशा अमानुष अत्याचारांनीं लांछन लावलें आहे ! या अमानुष अत्याचारांत सर्व जमातींच्या घटकांनीं भाग घेऊन माणुसकीला कायमचा बट्टा लावला आहे. ही भयानक परिस्थिति कोणत्या कारणांमुळें उत्पन्न झाली याचा गंभीरपणें विचार करणें हें सर्व प्रामाणिक देशभक्तांचें आणि बुद्धिमान् शिक्षणशास्त्रज्ञांचें आद्य कर्तव्य आहे. माथेफिरूपणाच्या या बावटळीनें आपल्या बिनमोल स्वातंत्र्याला धोका पोहोंचूं नये अशी खबरदारी सर्वांनीं घेतली पाहिजे व त्याकरितां आपली सर्व शक्ति आणि आपलीं सर्व साधनें पणाला लावण्यास तयार झालें पाहिजे. आपण परिस्थितीचें पृथक्करण चिकित्सापूर्वक आणि निर्विकारपणें करूं लागलों तर आपणांस असें आढळून येईल कीं, ज्याप्रमाणें एका सुप्रभातीं स्वर्गांतील अमृताप्रमाणें स्वातंत्र्य हें अनपेक्षितपणें अवतरलें नाहीं, त्याचप्रमाणें जातीय माथेफिरूपणा हाहि कांहीं एकदम अनपेक्षितपणें झालेला असा स्फोट नव्हे. तो एका प्रदीर्घ अशा कारणपरंपरेचा उद्रेक आहे. गेलीं कित्येक वर्षेंपर्यंत वृत्तपत्रांतून व व्यासपीठांवरून राजकारणी वावदूकांना, त्याचप्रमाणें ज्यांना आपल्या समाजापेक्षां आपला स्वार्थ आणि आपल्या राष्ट्रापेक्षां आपली जात अधिक प्रिय वाटते अशा स्वार्थलंपटांना धुमाकूळ घालावयाची, जनतेच्या सुखाची धुळधाण करावयाची आणि देशांतील निरनिराळे वर्ग व जमाती यांमध्यें विषबीजें पेरावयाची सरसहा परवानगी मिळाली होती ! जे गुन्हे झाले त्यांना जबाबदार कोण या चर्चेमध्यें किंवा राजकारणामध्यें मला



अनुक्रमणिका






शिरावयाचें नाहीं. शिक्षणशास्त्राचा अभ्यासक म्हणून मला जी गोष्ट महत्त्वपूर्ण वाटते ती ही कीं, अशा प्रकारचे अत्याचार घडून आले आहेत आणि त्यामुळें एक मानसिक विकृतावस्था निर्माण झाली असून हजारों, लाखों स्त्रीपुरुषांच्या मनाला खोल जखमा झाल्या आहेत !—त्या स्त्री–पुरुषांचा तोलच गेल्यासारखा झाला आहे. ज्या शांति, बंधुभाव, आणि मानवता ह्या सांस्कृतिक मूल्यांबद्दल हिंदुस्थानला ( हिंदुस्थानांतील सर्व जमातींना ) आजवर अभिमान वाटत आला, त्या मूल्यांविषयींची त्या सर्वांची धारणाच शिथिल झाली आहे व या नैतिक अधःपातामुळें देशाच्या भविष्यकालाबद्दल भीति वाटूं लागली आहे.

## गेलें महायुद्ध

आणखी एका गोष्टीनें परिस्थिति अधिकच विकट झाली असून तिचा शिक्षणशास्त्रज्ञांनीं आणि मुत्सद्द्यांनीं अवश्य विचार केला पाहिजे. ती गोष्ट म्हणजे गेल्या महायुद्धाचा जगावर व आपणांवर झालेला परिणाम. गेल्या महायुद्धांत झालेल्या रक्तपातांना आणि अमानुष अत्याचारांना इतिहासांत तोड नाहीं. आपल्या दुष्कर्माचें घोर फळ आपण टाळूं शकणार नाहीं. पुढेंमागें केव्हां तरी आपल्या पापांचें प्रायश्चित्त आपणांस भोगावें हें लागणारच. युद्धाच्या खाईंत आपण लोटले जात असतां ज्या जगानें त्याविरुद्ध प्रतिकार केला नाहीं, सैनिक त्याचप्रमाणें इतर सामान्य नागरिक यांचा विनाश करावयाला व त्यांना हालहाल करून मारावयासाठीं शोधून काढलेलीं नवनवीन अद्भुत साधनें वापरावयाला ज्या जगाला दिक्कत वाटली नाहीं, लोकांचे समूहचे समूह कापून काढणें हाच खऱ्या देशभक्तीचा आणि राष्ट्रसेवेचा उत्कर्ष होय, अशी श्रद्धा लोकांच्या मनावर ठसवावयाला ज्या जगानें पाण्यासारखा पैसा सांडला, ज्या जगानें हिंसेला धर्माचें पावित्र्य बहाल करून अणुस्फोटकाचें समर्थन केलें, तें अत्याचारांनीं बरबटलेलें निर्बुद्ध जग युद्ध संपल्यावर चुटकीसरसें पुनः भानावर येईल हें कसें शक्य आहे ? ज्या लक्षावधि लोकांनीं युद्धांत प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष भाग घेतला, ज्यांनीं बाँबवर्षाव केला आणि अनुभवला, ज्यांनीं कर्तव्यबुद्धीनें स्वधर्मपालन म्हणून माणसांचे हालहाल केले, त्यांना स्वतःचे त्याचप्रमाणें दुसऱ्यांचेहि प्राण कस्पटासमान वाटणें स्वाभाविकच आहे. ज्या दारुण यातना त्यांनीं अनुभविल्या आहेत त्यांचा जर आपण विचार केला, तर त्यांनीं नागरिक जीवनाच्या कायद्यांबद्दल आदर बाळगावा किंवा आपल्या बांधवांच्या होत असलेल्या हालअपेष्टांबद्दल त्यांची सहानुभूति उचंबळून यावी, अशी अपेक्षा आपण कशी करावी ? उलट पक्षीं शांततेच्या काळांतहि त्यांनीं थोडेंसें निमित्त सांपडतांच अत्याचारी मार्गाचा अवलंब केला तर त्यांत अस्वाभाविक असें काय आहे ? हा एक जागतिक प्रश्न झाला असून आतांपर्यंत आपल्यांतच मस्त असलेल्या युद्धबाज लोकांना आतां कोठें त्याचें घोर स्वरूप कळून येत आहे. हिंदुस्थानबाबत तर हा प्रश्न अति कठिण होऊन बसला आहे. म्हणून प्रौढ–शिक्षणाची योजना आंखतांना, आपण दोन विशिष्ट गटांकडे विशेष लक्ष दिलें पाहिजे—एक म्हणजे निर्वासित किंवा शरणार्थी : यांनीं दारुण यमयातना अनुभविल्या असून त्यांमुळें यांचीं अंतःकरणें उद्विग्न आणि द्वेषभावनेनें भरून गेलेलीं आहेत; दुसरा गट म्हणजे युद्धावरून परत आलेले सैनिक : जीवनाविषयींचें पावित्र्य आणि त्यांतील सुकुमार संस्कृतिमूल्यें यांबद्दलची यांची आदरभावना नष्ट झालेली आहे. जनतेमधील या मोठ्या गटांस जमेस न धरतां व त्यांच्या पुनःशिक्षणाची (Re–educationची) तरतूद न करतां जर आपण प्रौढशिक्षण–योजना आंखली तर ती अपुरी आणि दोषपूर्ण राहणार हें निश्चित होय.

## पुन:शिक्षणा(Re-education)चें कार्य

म्हणून प्रौढ-शिक्षणापुढील महत्त्वाचें कार्य केवळ लोकांना लिहावयाला व वाचावयाला शिकविणें, त्यांच्या ज्ञानांत भर घालणें किंवा सर्वसामान्यपणें त्यांची कार्यक्षमता वाढविणें येवढेंच नाहीं. अर्थातच तेंहि महत्त्वाचें नाहीं असें नाहीं. परंतु प्रौढशिक्षण देतांना मुख्य लक्ष जर कशावर केंद्रित करावयास पाहिजे असेल तर तें सामाजिक आणि नैतिक पुनः–शिक्षणावर होय. सर्व धर्मांनीं प्रतिपादिलेली जीवनाबद्दलची पावित्र्यभावना त्यांच्या ठायीं पुनः प्रज्वलित केली








पाहिजे, जीवनाला कृतार्थ करणाऱ्या नैतिक आणि आध्यात्मिक मूल्यांची परमश्रेष्ठता पुनः प्रस्थापित केली पाहिजे. दोन्हीहि बाजूंना जें सूड–प्रतिसूडांचें, जातीय अत्याचारांचें दुश्चक्र सुरू झालें त्यामध्यें न सांपडतां ज्यांनीं आपला समतोलपणा, समंजसपणा व न्याय-बुद्धि कायम ठेविली अशा लोकांची संख्या फारच कमी आहे. दुःख आणि यातना यांच्या अनुभवानें, कित्येक वेळां तर त्यांबाबतच्या केवळ ऐकीव अति-शयोक्तिपूर्ण माहितीवरून—आणि अशी माहिती कांहीं वर्तमानपत्रें आपल्या फायद्याकरितां बिनदिक्कत देत असतात—नेहमींचीं सुसंस्कृत आणि सज्जन माणसें एकदम ताळतंत्र सोडून देऊन बिथरलेलीं आणि त्याच एका विचारानें वेडीं झालेलीं मीं प्रत्यक्ष पाहिलीं आहेत. त्यांची ही अवस्था बघून मला धक्का बसला आहे ! प्रत्यक्ष हत्याकांडांत आणि नासधूस करण्यांत हजारों लोकांनीं भाग घेतलेला आहे. ही गोष्ट अर्थातच वाईट आहे, तिचा निष्ठुर-पणानें कडक बंदोबस्त करणें शक्य आहे आणि तो केलाच पाहिजे. कारण कोणतेंहि सुधारलेलें सरकार अशा समाजकंटकांना समाज–व्यवस्थेचा व शांतीचा भंग किती दिवस करूं देईल ? परंतु अत्यंत भयदायक गोष्ट निराळीच आहे. ती ही कीं निरनिराळ्या जमातींचे लोक आपापल्या जमातींतील गुंडांनीं केलेले अमानुष अत्याचार निमुटपणें पाहतात, त्यांविरुद्ध ब्रहि काढीत नाहींत; उलट पक्षीं, तेच अमानुष अत्याचार इतर जमातीं-तील गुंडांनीं केलेले बघून हेच लोक सात्त्विक संतापा-चा आव आणून त्यांचा धिक्कार करतात ! हें जें विष चोरटेपणानें हळूहळू लोकांच्या बुद्धींत व अंतःकरणांत खोल जाऊन भिनत आहे, त्यामुळेंच प्रौढशिक्षणाची महासमस्या अत्यंत बिकट झाली आहे. ज्या राष्ट्राची सदसद्विवेकबुद्धि, न्यायभावना व निःपक्षपाती निर्णय करण्याची शक्ति या बधिर (atrophied) होऊन अस्तप्राय झाल्या आहेत, तें राष्ट्र भौतिक वा नैतिक दृष्ट्या फार काळ टिकाव धरून राहणें शक्य नाहीं. म्हणूनच हा खिळखिळा झालेला राष्ट्राचा डोलारा प्रौढ–शिक्षणाची जोराची मोहीम उभारून पुनः मजबूत केला पाहिजे. सामाजिक आणि राजकीय जीवनांत शांति, समंजसपणा आणि न्याय यांची स्थापना करण्याकरितां ज्या शक्ती, जे लोक व ज्या संस्था प्रयत्न करीत आहेत त्यांना आपण मनःपूर्वक पाठिंबा दिला पाहिजे.

## राष्ट्रीय पुनरुत्थानांत प्रौढ–शिक्षणाचें स्थान

वरील विचारांवरून दिसून येईल कीं प्रौढ–शिक्षण हें १९४६मध्यें नुसतें महत्त्वाचें असेल तर आज १९४७ सालीं तें जीवनमरणाइतकें निर्वा-णीचें झालें आहे. अर्थात् प्रौढ–शिक्षण याचा व्यापक अर्थ आपण घेतला पाहिजे; त्यांत राजकीय, नागरिक आणि नैतिक शिक्षणाचाहि अंतर्भाव केला पाहिजे. युद्ध आणि युद्धोत्तर परिणाम, आपलें राजकीय स्वातंत्र्य व देशाची फाळणी यांनीं उत्पन्न केलेले प्रचंड प्रश्न जर आपण आपल्या मनांपुढें आणले तर प्रौढशिक्षणाच्या ज्या योजना आणि जी तरतूद आपण आपल्या केंद्रांतून करीत आहों त्या किती अपुऱ्या, तुटपुंज्या आणि 'दर्यामें खस-खस' अशा स्वरूपाच्या आहेत हें आढळून त्यांची कींव येते ! समजा, सगळ्यांना नुसतें लिहितां, वाचतां आणि त्रैराशिक सोडवतां आलें तरी त्याचा आपल्या जनतेला कांहीं खरा उपयोग आहे का ? अशा तांत्रिक तकलुपी शिक्षणानें, वृत्तपत्रांतून आणि व्यासपीठांवरून शब्दबंबाळ बावदूक ज्या भोळ्या-भावड्या लोकांना 'बनवितात', त्यांच्या संख्येंत मात्र अधिक भर पडेल. म्हणून हा प्रश्न सोड-विण्यास आपण अगदीं वेगळ्या आणि क्रांतिकारक रीतीनें उद्युक्त झालें पाहिजे. आपणांला साध्य काय करावयाचें आहे याची स्पष्ट कल्पना आपल्या मनासमोर असली पाहिजे. जनतेमध्यें रसिकता, विवेकशक्ति आणि सामाजिक भावना वाढीस लागल्या पाहिजेत. ललितकलेच्या क्षेत्रांत उच्च कोणतें व नीच कोणतें, ज्ञानाच्या क्षेत्रांत सत्य कोणतें नि असत्य कोणतें आणि सदाचाराच्या क्षेत्रांत चांगलें कोणतें आणि वाईट कोणतें हें जनतेला ओळखतां आलें पाहिजे. या सर्व दिशांनीं लोकांचें जीवन सुधारल्याशिवाय सुसंस्कृत आणि सामाजिक न्यायबुद्धीवर अधिष्ठित अशी समृद्ध लोकशाही निर्माण करण्याच्या कामांत लोक

हिरीरीनें भाग घेतील अशी अपेक्षा आपणांस कशी करतां येईल ?

हीं ध्येयें अत्यंत विशाल आणि महत्त्वाकांक्षापूर्ण आहेत यांत शंकाच नाहीं. परंतु त्यांना विशाल म्हणण्यानें तीं अव्यवहार्य आहेत, असें सुचवून त्यांना नांवें ठेवावयाचा हेतु मात्र नाहीं. उलट पक्षीं हीं विशाल ध्येयें साधण्याकरितां तितक्याच विशाल पद्धती आणि तितकेंच विशाल तंत्र आपण अवलंबिण्याची जरूरी आहे. राष्ट्राच्या विवेक–बुद्धीवर व साधनसामग्रीवर जर कोणती आद्य जबाबदारी असेल तर ती जनतेचें जीवन सुसंपन्न करणें ही आहे. ही जबाबदारी जगांतील पुष्कळ देशांतून मान्य झाली आहे येवढेंच नव्हे तर ती प्रत्यक्षांत आणण्याचे प्रयत्नहि झाले आहेत. या दृष्टीनें विचार करितां, आपल्याकडील प्रौढ–शिक्षणाचीं केंद्रें किती नीरस, रूक्ष आणि अक्षरशः खरोखरींच किती अंधकारमय अशीं असतात ! ह्या शिक्षणकेंद्रांमधून थकलेभागलेले, अर्धेकच्चे शिकलेले, पोटाला चिमटा घेऊन काम करणारे असे कार्यकर्ते जुलूम–जबरदस्तीनें आणून बसविलेल्या प्रौढांच्या गळीं बाराखड्यांचे घोट उतरविण्याची खटपट करीत असतात ! अशा शिक्षणकेंद्रांतून जनतेची भौतिक आणि सांस्कृतिक पातळी उंच करणें, सुसंस्कृत जीवनाची त्यांना ओळख करून देणें अशक्य आहे हें आपण लक्षांत ठेविलें पाहिजे. जर राष्ट्रीय पुनरुत्थानाच्या कार्यांत प्रौढ–शिक्षणाच्या चळवळीनें आपला वांटा खरोखर उचलावयाचा असेल तर हीं शिक्षणकेंद्रें चैतन्यानें रसरसलेलीं व जिवंत अशीं सामाजिक केंद्रें बनलीं पाहिजेत; त्या ठिकाणीं तेथील समाजाची प्रत्यक्ष आणि संभाव्य अशी सांस्कृतिक साधनसंपत्ति केंद्रित झाली पाहिजे; तेथील सदस्यांना स्वतःच्या प्रगतीविषयीं प्रत्यक्ष आवड उत्पन्न झाली पाहिजे; त्या केंद्राच्या परिसरांत आणि वातावरणांत त्या आवडीचें सहकार्यानें करावयाच्या उद्योगांत रूपांतर झालें पाहिजे. ह्या गोष्टी कोणाला आकाशांतील चंद्र हस्तगत करण्याइतक्या अशक्यप्राय वाटतील ! पण तसें वाटण्याचें कारण नाहीं. कोठेंहि खऱ्या कळकळीचे व सामाजिक प्रवृत्तीचे असे थोडेहि कार्यकर्ते मिळाले तरी ह्या गोष्टी केवळ मनोरथ न राहतां सत्यसृष्टींत येतील. लोकांचा एकादा समाज कितीहि अज्ञानी आणि चरितार्थाच्या चिंतेनें पीडिलेला असो, जर त्याच्या जीवनांत थोडासा प्रकाश, थोडासा आनंद, थोडीशी बंधुभावना आणण्याचा प्रयत्न आपण वारंवार केला तर अशा प्रयत्नाला तो समाज काय सारखाच विरोध करील ? संध्याकाळीं एके ठिकाणीं बसून चिलीम ओढावयाची, गाणीं गावयाची, लहानसे नाट्यप्रसंग करून दाखवावयाची, गोष्टी–कथा ऐकावयाची आणि भजनें व धार्मिक कथा श्रवण करावयाची संधि जर मिळाली तर ती लोकांना नको का आहे ? मग त्या दिशेनें सुरुवात करावयाला काय हरकत आहे ? खेड्यांतील लोकांनीं सहज एके ठिकाणीं जमून एकमेकांची करमणूक करण्यास सुरुवात करावी. अशी एकदां सुरुवात झाली म्हणजे जमलेल्यांपैकीं कांहींजण आपल्या समान अडचणी, गरजा व आपल्यापुढील समान प्रश्न बोलून दाखवितील आणि त्यांवर चर्चाहि करतील. अशा रीतीनें चर्चामंडळाच्या स्थापनेचा उत्तम श्रीगणेशा होईल; आणि त्यांतूनच पुढें लोकांना आवडणाऱ्या आणि उपयोगी अशा विषयांवर 'व्याख्यानमाला' करतां येतील. जर शिक्षणकेंद्रांतील कार्यकर्ता नेतृत्वगुणसंपन्न असेल, त्याला जर प्रौढांचें मानसशास्त्र अवगत असेल, तर त्याच्या हाताखालीं तें शिक्षणकेंद्र एक जिवंत असें सार्वजनिक केंद्र बनेल. अशा सार्वजनिक केंद्रांच्या चव्हाट्यावर विचारांची देवाण–घेवाण होईल, वर्तमानपत्रें वाचून त्यांवर विवेकपूर्वक चर्चा करितां येईल व चालू घडामोडींविषयीं लोकांत आवड उत्पन्न करून ती वाढवितां येईल. अर्थात्च असा आरंभ जरी अल्प प्रमाणांत झाला असला व आरंभीं जरी स्थानिक प्रश्नांवरच लक्ष केंद्रित झालें असलें, तरी लवकरच तें लक्ष व ती आवड वाढत वाढत अधिक व्यापक होत जाऊन जिल्ह्यांतील, प्रांतांतील, देशांतील किंबहुना जगांतील देखील घडामोडींपर्यंत पसरणें अपरिहार्य आहे. अशा रीतीनें प्रौढशिक्षण–केंद्र हें नागरिक–शिक्षणाचें विद्यालय बनेल. अर्थात्च हें नागरिक–शिक्षण केवळ 'पुस्तकस्थ' आणि तात्त्विक नसणार. सर्वांच्या समान कल्याणाच्या योजना








हातीं घेतल्यास प्रत्यक्ष अनुभवाच्या योगानें लोकांना सहकार्य आणि सामाजिक देवाणघेवाण यांचें महत्त्व पटेल आणि अशा रीतीनें त्यांना आपोआपच लोकशाही यशस्वी करावयाला जे गुण आवश्यक आहेत त्या गुणांचें शिक्षण मिळेल, लोकगीतें, लोकनाट्य इत्यादि आत्माविष्काराचे कलाप्रकार यांबद्दलची लोकांची आवड जागृत केल्यास त्यांची रसिकता वाढेल आणि त्यांचें जीवन समृद्ध होईल येवढेंच नव्हे, तर व्यापारी धोरणामुळें कलांचे व संगीताचे जे हिणकस प्रकार त्यांच्यापुढें येत आहेत त्यांना ते फशीं पडणार नाहींत. त्याचबरोबर वैज्ञानिक शोधांनीं जीं श्राव्य व दृश्य साधनें आपणांस उपलब्ध करून दिलीं आहेत त्यांचाहि आपणांस उपयोग करून घेतां येईल. जर त्या साधनांचा सुसंघटित व डोळस रीतीनें उपयोग करून घेतां आला तर लोकांचीं मनें विकसित करण्यांत त्यांचा प्रभावी परिणाम दिसून येईल. वृत्तसाहित्यांतून आणि नभोवाणीवरून प्रसृत होणाऱ्या अनुक्रमें छापील आणि उच्चारित शब्दांचा साक्षर त्याचप्रमाणें निरक्षर जनतेवर मोठा प्रभाव पडत असतो हें खरेंच; परंतु त्यापेक्षांहि चित्र–पट व बोल–पट यांचा चित्तावर उमटलेला ठसा अधिकच खोल आणि परिणामकारी असा असतो. कारण, त्यांमध्यें डोळे, कान आणि कल्पनाशक्ति हीं एकाच वेळीं आकर्षून घेतलीं जातात. अशा रीतीनें प्रौढ–शिक्षणाचा जर सामाजिक शिक्षण असा व्यापक अर्थ केला आणि प्रौढ–शिक्षणाच्या अंगीं मनुष्याच्या व्यक्तित्वाचा सर्वांगीण विकास करावयाचें सामर्थ्य आलें—आणि पुढारलेल्या सर्व देशांत शिक्षणाचा हाच खरा आशय आहे—तरच आपल्या देशाची आणि त्यांतील संभ्रान्त लोकांची विपन्नावस्थेपासून सुटका होईल. पण हें कार्य इतक्या मोठ्या जबाबदारीचें आहे कीं तें केवळ शिक्षणखात्याकडून किंवा सरकारी यंत्राकडून होणार नाहीं. त्याकरितां सर्व सरकारी आणि बिनसरकारी संस्थांचें, सर्व सत्प्रवृत्त आणि सामाजिक वृत्तीच्या व्यक्तींचें सहकार्य पाहिजे. काम इतकें मोठें व विविध आहे कीं ज्याला ज्याला या सेवक–सैन्यांत दाखल व्हावयाचें असेल त्या प्रत्येकाला—विद्यार्थी, शिक्षक, राजकीय कार्यकर्ते, लेखक, मजूर, कारागीर, धंदेवाले अशा–प्रत्येकाला त्यांत भरपूर वाव आहे. हे सर्व लोक किंवा यांपैकीं कांहीं निवडक अशीं माणसें या कार्यांत पडतील; पण त्याकरितां या कार्याच्या नेतृत्वस्थलापासूनच स्फूर्तिदायक असें मार्गदर्शन व्हावयास पाहिजे. "हें राष्ट्रीय धर्मकार्य असून आपण प्रत्येकानें यांत भाग घेतला पाहिजे" असा प्रत्येकाला उत्साह उत्पन्न व्हावयाला पाहिजे असेल तर स्फूर्तिदायक नेतृत्वाची जरूरी आहे. महाकार्यें तडीस न्यावयाचीं असतील तर उत्स्फूर्त उत्साह आणि ध्येयवाद यांच्या ऊर्मी कार्यकर्त्यांत उचंबळून आल्या पाहिजेत. चांचरत चांचरत क्षुद्र मनानें अवलंबिलेल्या उपायांनीं मोठें यश मिळणें कसें शक्य होईल? म्हणूनच राष्ट्राचे प्रमुख नेते हा प्रश्न कसा सोडवितात यावरच पुष्कळश्या गोष्टी अवलंबून आहेत. माझी येवढीच प्रार्थना आहे कीं, त्यांना या कामीं ध्येयवाद आणि कल्पनाशक्ति यांचा वरदहस्त असावा.

## सर्वश्रेष्ठ प्रौढशिक्षणशास्त्रज्ञ—म. गांधी

म. गांधी हे या देशांतच नव्हे तर सगळ्या जगांत प्रौढ–शिक्षणाच्या कार्यांतील अत्यंत श्रेष्ठ कार्यकर्ते असून त्यांना मी सादर स्नेहभावानें अभिवादन करतों. माथेफिरूपणा आणि द्वेष यांचें तुफान भोंवतीं थैमान घालीत असतांनाहि असीम धैर्यानें आणि चिकाटीनें ते निश्चल राहिले आहेत. आणि वाट चुकलेल्या झुंडींना आपल्या धीरगंभीर वाणीनें हांक मारून त्यांना स्वाभिमान, प्रामाणकपणा आणि प्रेम यांच्या मार्गावर ते आणीत आहेत. त्यांच्यापेक्षां कमी मनोबल असलेलीं माणसें जनतेमध्यें संचरलेल्या मनोविकृतींच्या वावटळीबरोबर वाहून गेलेलीं दिसून येतात. पण ते मात्र धीरगंभीर व निश्चल असे उभे आहेत. जनतेमधील द्वेष आणि अत्याचार यांच्या प्रवाहाबरोबर प्रवाह–पतिताप्रमाणें वाहत जाऊन लोकप्रियता मिळविणें इतकें सुलभ असतांहि, त्यांनीं सत्य तेंच बोलून लोकांची अप्रियता, शिवीगाळ आणि त्यांचे गैरसमज हीं आपणावर आपण होऊन ओढवून घेतलीं आहेत. त्यांचीं तीं अलीकडचीं प्रार्थनोत्तर भाषणें! त्यांतलि ती भाषा! तिला कृत्रिम अलंकार आणि काटेकोर व्याकरण यांची काय मातब्बरी? तीं भाषणें इतिहासांत खरोखरीं गिरिप्रवचनाप्रमाणें ( Sermon on the







mountप्रमाणें ) अजरामर होतील. याचें कारण त्यांत नैतिक भव्यता आणि निर्भेळ प्रामाणिकपणा हीं तर आहेतच; पण शिवाय तीं कितीहि उच्च अशा नैतिक पातळीवरुन केलीं असलीं तरी त्यांमधून दैनंदिन व्यवहारांना नीतितत्त्वें कशीं लागू करावयाचीं याचें सखोल ज्ञान दिसून येतें. गांधीजींचें सबंध जीवन नानाविध पराक्रमांनीं परिपूर्ण असून त्यांना मिळालेल्या यशःसिद्धीचा विचार करतां तें अद्वितीय आहे यांत शंकाच नाहीं. परंतु शैक्षणिक दृष्टीनें विचार करतां त्यांनीं गेल्या कांहीं महिन्यांत जें करून दाखविलें तो त्यांच्या जीवनाचा कळसच होय ! कारण, दुसऱ्याच्या डोळ्यांतील मुसळ पाहावयाचीच—दुसऱ्याच्या डोळ्यांतील मुसळ कोणाहि अधू दृष्टीच्या मूर्खालाहि दिसूं शकतें !—दृष्टि त्यांना होती असेंच केवळ नव्हे तर, जें एकादा दिव्य दृष्टीचा ऋषीच पाहूं शकतो असें स्वतःच्या डोळ्यांतील कुसळ देखील ते पाहूं शकत. अशा रीतीनें कोट्यवधि लोकांचें एक राष्ट्र नैतिक मृत्यूच्या गर्तेकडे घसरत असतांना त्यांनीं त्याला वांचविलें आहे.

गांधीजींच्या भूमिकेचें जर वर्णन करावयाचें असेल तर त्या वर्णनाला सुप्रसिद्ध कविवर्य इक्बाल यांच्या पुढील सुंदर शब्दांपेक्षां अधिक सुंदर शब्द कोठें सांपडतील?

‘हवा है गो तुन्द व तेज़ लेकिन
चिराग अपना जला रहा है
वह मर्द दरवेश, जिसको हकने
दिये हैं अन्दाज़ खुसवाना’

“Fast and furious blows the storm,
But calmly lights his lamp
The man of God whom He has given
The qualities and attributes of a King.”

गांधीजींनीं अंगीकृत केलेल्या ह्या धर्मकार्यांत प्रौढशिक्षण–क्षेत्रांतील प्रत्येक कार्यकर्त्यानें हातभार लावणें हें त्याचें परमोच्च कर्तव्य होय. कारण त्या कार्याच्या सिद्धीवरच आपल्या राष्ट्राच्या नीतिमत्तेचें भवितव्य अवलंबून आहे.

---

## गांधीजींचा मार्ग—

विशेषतः फ्रान्स आणि ब्रिटन यांच्या परिस्थितीचा विचार करतां त्या दोन्हीहि देशांनीं रशियाला सशस्त्र प्रतिकार करूं नये याला बलवत्तर कारणें आहेत. जर पुढील युद्धांत अॅटम बाँब वापरला गेला तर ह्या देशांची नुसती राखरांगोळी होऊन जाईल. अॅटम बाँबनें काळ्याठिक्कर होऊन गेलेल्या प्रेतवत् नागरिकांना रशियन सत्तेखालीं स्वातंत्र्य मिळण्याची तिळमात्र तरी आशा राहील का? पण गांधीजींनीं प्रतिपादिलेल्या त्या सविनय प्रतिकाराचा जर लोकांनीं जिवंत असतांनाच अवलंब केला, तर त्यांना अजूनहि सर्वाधिकारी शासनसंस्थे( totalitarian state )चे दुष्परिणाम कमी दुःसह करतां येतील.

—सर नार्मन एन्जल,
( अमेरिकन पीस–सोसायटीसमोर केलेल्या भाषणांतून ) हिंदु, ७।५।४८,








# सुलभा

प्रा. गंगाधर गाडगीळ

[प्रभाकरच्या घराचा दिवाणखाना. सुलभा कुसुमाग्रजांची कविता गुणगुणते आहे. तिचा पांच वर्षांचा मुलगा एका कोंपऱ्यांत पत्त्यांचा बंगला बांधीत आहे.]

**सुलभा**—काढ सखे गळ्यातील
तुझे चांदण्याचे हात.

**विश्वास**—आई, ए आई, अग आई, (जवळ येऊन तिला हलवतो.) आई ग, पाहा ना माझ्याकडे? नाहीं तर डोंगळा होऊन चावेन मी तुला.

**सुलभा**—अं? अं? काय म्हटलेंस?

**विश्वास**—हें ग काय तुझें आई? तूं मुळीं माझ्याकडे बघतच नाहींस. मीं काय चिंध्यांचें गांठोडें आहें वाटतें? कीं मी फाटका पतंग आहें?

**सुलभा**—छे रे राजा! तूं तर माझें फुलपांखरूं आहेस, मोत्यांचा हार आहेस, उदबत्तीच्या धुराची नाजूक झुलती कमान आहेस!

**विश्वास**—खोटें! अगदीं खोटें! चिमणीच्या दातांसारखें खोटें! जाईच्या कांडीसारखें खोटें!

**सुलभा**—छे रे राजा! अगदीं खरें. आजोबांच्या सोन्याच्या दातांसारखें खरें, धुणीं वाळत घालण्याच्या काठीसारखें खरें.

**विश्वास**—मग आम्हाला असलें म्हातारें आणि मारकुटें खरें नकोच.

**सुलभा**—वा रे वा! म्हणजे तुला खरें नको आणि खोटें पण नको! मग हवें तरी काय तुला?

**विश्वास**—सांगूं मला काय हवें तें? मला पत्त्यांचा बंगला खरा व्हायला पाहिजे आणि आजोबा खोटे व्हायला पाहिजेत.

**सुलभा**—आजोबा कसे खोटे होतील?

**विश्वास**—सांगूं? आपली ती औषधाची मोडक्या कंबरेची बाटली आहे ना? ती तूं घेशील, मग परीसारखी उडत उडत त्यांच्या खोलींत जाशील आणि त्यांना त्या बाटलींत बंद करून ठेवशील! मग मी ती बाटली रोज खेळायला घेईन. कशी होईल मग आजोबांची फजिती?

**सुलभा**—असें नाहीं हं बोलायचें, विश्वास? शहाणा आहे माझा राजा!

**विश्वास**—खरेंच मी राजासारखा दिसतों का ग?

**सुलभा**—हो तर, अगदीं चौकटच्या चक्रम् राजासारखा!

**विश्वास**—हॅट, मुळींच नाहीं. माझें पोट काय ढमालें आहे वाटतें? माझे केस काय मडमेसारखे लांब आणि पिंवळे आहेत? आणि मी काय थबकडी चौकोनी टोपी घालतों वाटतें?

**सुलभा**—हो ना? अगदीं तसेंच! शिवशीय शाळेचा शिपाई घालतो तसले सोनेरी बटणांचें जाकीट तूं घालतोस आणि गोग्रास मारणाऱ्या माणसासारखा लाल पट्टा गळ्यांत अडकवतोस! पाहा तरी आरशांत?

**विश्वास**—हॅट, मुळींच नाहीं. तूंच आहेस किलावरची काळी राणी! चंबूच्या गळ्यासारखी मान, कोळशाच्या टोपलीसारखे केस आणि बुटकुल्यायेवढी टोपी!

**सुलभा**—(मोठ्यानें हंसते.) खूप मजा येईल नाहीं, विश्वास? तूं हो चौकटचा चक्रम् राजा आणि मी होईन किलावरची तिरसट राणी.








**विश्वास**––आणि आपण दोघे माझ्या पऱ्यांच्या बंगल्यांत राहूं. पाहा तरी किती छान बंगला बांधला आहे मीं तो ?

**सुलभा**––वा ! अगदीं लिंबोणीच्या झाडाखालच्या मामाच्या चिरेबंदी वाड्यासारखा आहे कीं ! रंग तरी किती तुकतुकीत आहे त्याचा ! अगदीं ससाच्या पाठीसारखा.

**विश्वास**—हो ना ? चांदण्याचा रंग दिलाय आम्हीं त्याला. आणि बाबांच्या निळ्या टिपकागदांची कौलें घातलीं आहेत. त्याच्या भोंवतीं गवताच्या पिंवळ्या फुलांची बाग करणार आहें मी !

**सुलभा**—आणि इंजेक्शनच्या सुईचें आपण तेथें कारंजें करूं.

**विश्वास**—हां, हां. तें किती छान होईल नाहीं ? मग तूं खालच्या मजल्यावर राहा आणि मी वरच्या मजल्यावर राहीन.

**सुलभा**––अं हं, आम्हीं नाहीं राहणार खालच्या मजल्यावर.

**विश्वास**—असें काय ?

**सुलभा**—छट्, आम्हीं नाहीं.

**विश्वास**—बरें बुवा, तूं राहा वरच्या मजल्यावर. अं ? रागावलीस ? कढईतल्या पुरीसारखी रागावलीस कीं चित्रांतल्या देवीसारखी ? बघ ! परत तूं नखांवर रेघा काढायला आणि लांब कुठें तरी पाहायला लागलीस .

**सुलभा**—छे रे, लक्ष आहे माझें तुझ्याकडे. मी वरच्या मजल्यावर राहीन, बरें कां ? आणि मग तुझ्यावर ओरडेन, "खालीं नळ बंद करा."

**विश्वास**––( मोठ्यानें हंसतो. ) मग मीहि पण ओरडेन, 'पण आमचीं धुणीं–भांडीं व्हायला हवीं कीं नको ?' आई, म्हाताऱ्या आजोबांसारखें तूं हें पण खोटें करून टाक हं !

**सुलभा**—वेड लागलंय तुला, विश्वास.

**विश्वास**—पण तूं सुद्धां आतां वेडी झाली होतीस कीं माझ्याचसारखी ? अगदीं चिमणीच्या दांतांसारख्या गुदगुल्या करीत होतीस तूं मला. तूं मोठी आहेस तरी सुद्धां कशी ग अशी वेडी होतेस माझ्यासारखी ?

**सुलभा**––सांगू कां ? कधीं कधीं मला खूप तहान लागते. मग मी खूप खूप दूर जातें.

**विश्वास**––कशी जातेस ? जादूच्या गालिच्यावर बसून ?

**सुलभा**––नाहीं. उदबत्तीच्या धुराच्या कमानीवर बसून. आणि मग मी निळ्या डोंगराच्या कुशींत लपलेल्या एका तलावांतलें थंडगार पाणी पितें. मग...

**विश्वास**––मग तूं गोष्टींतली परी होतेस ना ?

**सुलभा**—नुसती परीच कां ? वाघाची मावशी होतें, मोपळ्यांत बसलेली म्हातारी होतें, झोंपीं गेलेलें नगर जागें करणारी राजकन्याहि होतें.

**विश्वास**—किती छान ! कोठें आहे तो तलाव ?

**सुलभा**—इथेंच, तुझ्या डोळ्यांत.

**विश्वास**—अं ?

**सुलभा**––वेडा आहेस तूं. जा, आतां खालीं जा तूं खेळायला. थोड्या वेळानें ऑफिसांतून येईल ना स्वारी ?

**विश्वास**—पण रात्रीं मला गोष्ट सांगितली पाहिजे हं ? अं ? ( जातो. )

**सुलभा**—काढ सखे गळ्यांतील
तुझे चांदण्याचे हात.

[ घंटा वाजते. सुलभा जाऊन दार उघडते. ]

**सुलभा**—हें काय ? आज जरा लवकर येणें झालें ?

**प्रभाकर**—हो, जरासें लवकरच. कां ? पण असें कां म्हटलेंस तूं ? मी लवकर आलों तर काय बिघडलें ?

**सुलभा**—इश्श ! असा वाटतें माझ्या बोलण्याचा अर्थ ?

**प्रभाकर**—पण मी लवकर आलोंय कुठें ? नेहमीं साडेपांचला येतों तो आज सव्वापांचला आलों, इतकेंच.

**सुलभा**—ह्या उन्हाळ्यानें कीं नाहीं माणूस दमून जातें अगदीं.

**प्रभाकर**––उद्यांपासून मुळीं आठ वाजतांच घरीं येत जाईन मी !

**सुलभा**––असें काय तें ? द्या ना तो कोट इकडे ?

**प्रभाकर**––मग आधींच कां नाहीं घेतलास ?



अनुक्रमणिका






**सुलभा**--थांबा. टाय सोडतें मी. सिगरेट्ची पेटी हवी असेल ना ? कीं असूं दे कोटाच्या खिशांतच ?

**प्रभाकर**--पण तुला आवडत नाहीं ना सिगरेट् ओढलेली ?

**सुलभा**--इश्श ! माझें काय मेलीचें ?

**प्रभाकर**--मग आण तर. मी सारख्या सिगरेट्सच ओढीत बसतों आणि तूं सारखी तें पाहत बस माझ्यासमोर.

**सुलभा**--असें काय बोलतांय मघांपासून ? चुकलें कां कांहीं माझें ?

**प्रभाकर**--(हंसून) च् ! चक्रम्पणा करतोंय मी. जा बरें, पटकन् चहा घेऊन ये. मग मी स्वस्थ वाचत बसणार आहें.

**सुलभा**--अगदीं चटकन घेऊन येतें हं चहा ! तोंपर्यंत तें नवें मासिक पाहावें जरा.

**प्रभाकर**--मला नाहीं वाचायचें कांहीं देखील.

**सुलभा**--मग ?

**प्रभाकर**--मी स्वयंपाकघरांत येऊन पाहतों तूं चहा कसा करतेस तें.

**सुलभा**--इश्श, मग चला ना ?

**प्रभाकर**--नको, मी इथेंच बसतों.

**सुलभा**--बघा बाई, आतां करायचें तरी काय माणसानें ?

**प्रभाकर**--माझ्याकडे दुर्लक्ष करायचें. सरळ निघून जायचें.

**सुलभा**--म्हणे दुर्लक्ष करायचें ! शहाणेच कीं नाहीं ? आतां अगदीं दोनच मिनिटांत चहा घेऊन येतें मी. मग बरें वाटेल मनाला. ( जाते. )

**प्रभाकर**--हुश्श ! 'संसार' मासिक काय ? नवीनच दिसतंय. अं ? हें काय ? म्हणे 'सुखी संसाराच्या सात समस्या'. अकलेची अमावास्या झाली आहे बेट्यांच्या ! संसारांतलें सुख महिन्यांतून एकदां आइसक्रीम पार्टी केल्यानें लाभतें काय ?

[ विश्वास धांवत येतो. ]

**विश्वास**--आई, ए आई, आई कोठें आहे ?

**प्रभाकर**--(विश्वासला पकडून) अरे चोरा, कसा पकडला तुला ? कशाला रे हवी आहे आई तुला ?

**विश्वास**--काम आहे माझें खूप महत्त्वाचें.

**प्रभाकर**--बाप रे ! येव्हांपासून महत्त्वाचीं कामें रे कसलीं करतोस ? कोणाचें लग्नबिग्न जमवतो आहेस कीं काय ?

**विश्वास**--अं हं. आमची आहे जंमत. ती तुम्हांला नाहीं समजायची.

**प्रभाकर**--अरे, समजली नाहीं तर समजावून सांग. पण तुझ्या आणि आईच्या जमतींत मला घेशील कीं नाहीं ?

**विश्वास**--अं ? नकोच पण. मी आईकडेच जातों.

**प्रभाकर**--अरे, पण सांगशील कीं नाहीं मला ? कीं मी म्हणजे कोणीच नव्हे ?

**विश्वास**--अं ? नाहीं, नाहीं. सांगतों. मला एक रंगीत गोटी मिळाली आहे, ती आईला दाखवायची आहे.

**प्रभाकर**--हात् तुमची ! येवढेंच ना ? मग ह्यांत रे काय आहे मला न समजण्यासारखें ? थांब. ही गोटी कारखान्यांत कशी बनविली तें सांगतों तुला.

**विश्वास**--अहो, ही गोटी नाहीं आहे ! हा आमच्या राजवाड्याच्या छपरावर लावायचा दिवा आहे !

**प्रभाकर**--असें, असें ! मोठ्या विक्षिप्त कल्पना आहेत बाबा तुझ्या ! अरे, ह्या गोटीचा दिवा कसा होईल ?

**विश्वास**--कसा होईल म्हणजे ? होईल आपला आपोआप, जादूनें ! आईला विचारा म्हणजे सांगेल ती. तिला सगळें समजतें.

**प्रभाकर**--तें कसें रे समजतें तिला ?

**विश्वास**--आई उदबत्तीच्या धुरावर बसते आणि खूप खूप दूर जाते.

**प्रभाकर**--अरे बापरे ! धुरावर बसून जाते काय ?

**विश्वास**--आणि मग एका तलावाचें पाणी पिऊन येते

**प्रभाकर**--कुठला रे बुवा हा तलाव ?

**विश्वास**--खूप खूप लांब आहे तो. डोंगराच्या कुशींत लपून बसला आहे.

**प्रभाकर**--मोठा विचित्र आहेस बुवा तूं ! (जांभई देतो.) बरें ! बरें ! ठीक ! जा पाहूं आतां खेळायला !

**विश्वास**--पण बाबा, तुम्ही कां नाहीं हो त्या तलावांतलें पाणी पीत ?

**प्रभाकर**--हं, हं. पिऊं हं, पिऊं. बरें, जा आतां. चॉकोलेट घेऊन ये खायला.








**विश्वास**—हं. पण बाबा, तिथलें पाणी प्यायल्यावर सगळें सगळें समजायला लागेल तुम्हांला. मग इतकी गंमत होईल !

**प्रभाकर**—छे बुवा ! मुलखाचा वडवड्या आहेस तूं ! एकदां रेडिओ चालू झाला कीं बंद म्हणून नाहीं व्हायचा.

[ सुलभा चहा घेऊन येते ]

**सुलभा**--विश्वास, आलास वाटतें तूं ? खालीं खेळायला जायला सांगितलें होतें ना तुला ?

**विश्वास**—होय ग, पण मला एक जंमत मिळाली ती दाखवायला आलों होतों तुला.

**सुलभा**—हें बघ ! आतां नको जमंत दाखवूं मला. रात्रीं निजतांना मी तुला गोष्ट सांगेन ना, तेव्हां दाखव मला. अं ?

**विश्वास**--कसली गोष्ट सांगणार आहेस मला ?

**सुलभा**--किल्लावरच्या राणीची. पळूं नको हं खालीं खेळतांना ?

[ विश्वास जातो. ]

**सुलभा**--चहा घेणार ना ? थंड होईल तो.

**प्रभाकर**--हं. पण, बाकी अगदीं वेडा होणार आहे विश्वास आपला. काय एक एक गोष्टी सांगत होता तो मला !

**सुलभा**--तसाच आहे तो. त्याला कीं नाहीं, समजत नाहीं अजून.

**प्रभाकर**--आणि तुला पण वेडें बनविलें आहे वाटतें त्यानें ? कुठल्या तलावावर पाणी प्यायला पाठवतो तो तुला ?

**सुलभा**—इश्श ! त्याचें बोलणें कसलें मनावर घेतां ? चहांत साखर नाहीं ना जास्त झाली ?

**प्रभाकर**--पण मला साखर कमी लागते, म्हणून कां अगोड चहा पितेस ? हा काय तुझा हट्ट ?

**सुलभा**—इश्श, त्यांत कसला हट्ट ? तो अगोड चहाच मला जास्त गोड लागतो.

**प्रभाकर**--चू. हें पतिव्रतेचें उत्तर नकोय मला !

**सुलभा**--भला नाहीं दुसरें उत्तर देतां येत !

**प्रभाकर**—पण हा काय जुलूम ? प्रत्येक गोष्ट माझ्या मनासारखी कां करतेस तूं ? तुला काय आवडीनिवडी नाहींत ? हौशी नाहींत ? इच्छा नाहींत ?

**सुलभा**--तुमच्या इच्छा त्याच माझ्या इच्छा ! तुमचें सुख तेंच माझें सुख !

**प्रभाकर**—चू. हात टेंकले बुवा तुझ्यापुढें !

**सुलभा**—पुरे गडे असलें बोलणें. आज कीं नाहीं तुमच्या आत्याबाई आल्या होत्या बसायला. त्यांच्या समोरच्या त्या शिकाऱ्यानें म्हणे फार गंमत उडवून दिली परवां.

**प्रभाकर**--काय केलें बुवा त्यानें ?

**सुलभा**--म्हणे तो दारू पिऊन रस्त्यांत येऊन उभा राहिला आणि फाड फाड आपल्या गोळ्या झाडल्या त्यानें ! अशी तिरपीट उडाली आहे लोकांची !

**प्रभाकर**--( मोठ्यानें हंसतो. ) जीव घेऊन पळत सुटले असतील वेटे !

**सुलभा**—एक म्हणे कचऱ्याच्या पेटींत लपून बसला ! दुसरा म्हणे हातांतलें वर्तमानपत्र उघडून त्याच्या आड लपला !

**प्रभाकर**—( मोठ्यानें हंसतो. ) वर्तमानपत्राच्या आड लपला काय ? खूप केली बुवा त्यानें. बाकी बहुतेक माणसें अशीं बुद्दूच असतात, बरें कां ?

**सुलभा**—पण तो शिकारी तरी काय मेला..... !

**प्रभाकर**—अग, तो शिकारी म्हणजे आपले वामनराव गोडांबे.

**सुलभा**—हो, असेंच कांहीं तरी नांव सांगितलें खरें त्यांनीं.

**प्रभाकर**—अग, तेंच असणार तें. आणखी दुसरा आहे कोण शिकारी आत्याच्या घराजवळ राहणारा ? माझी त्यांची तशी चांगली ओळख आहे आणि एकदां त्यांच्याबरोबर शिकारीला देखील गेलों होतों मी. बंदूक सुद्धां झाडली एकदां. अन् काय ! असा हिसका बसलाय खांद्याला ! एकाद्या पाप्याच्या पितराचें बावखडच उखडलें असतें. माझा देखील नेम चुकलाच म्हणा ? पण शिकारीचें एकंदर तंत्र समजलें मला.

**सुलभा**—खरेंच गडे ! तुम्ही पण काढा बंदुकीचा परवाना आणि शिकारीला जात जा. खूप मौज वाटेल तुम्हांला.



अनुक्रमणिका








**प्रभाकर**--तसाच विचार आहे माझा. यंदां आतां बोनस मिळाला ना, कीं एक बंदूकच घेऊन टाकणार आहे मी. मग वेळ मिळाला कीं आपले चालले शिकारीला. पण मला वाटतें कीं पहिलें सावज तुलाच करावें.

**सुलभा**—इश्श ! कांहीं तरीच काय ! पण खरेंच बाई ! चांगलें असतें असला एकादा नाद असणें.

**प्रभाकर**—खरें सांगायचें म्हणजे मला बुवा मर्दानी खेळांची हौस आहे. तूं खेळतेस तसले ते बॅडमिंटन, पिंगपाँग वगैरे खेळ कांहीं मला आवडत नाहींत. सगळा बायकी कारभार ! लचकणें आणि मुरडणेंच फार ! दणकट व्यायाम देणारें असें कांहीं तरी पाहिजे, नाहीं का ?

**सुलभा**—हं.

**प्रभाकर**—आणि खात्रीनें सांगतों कीं अगदीं उत्तम शिकारी होईन मी. माझी दृष्टि तशी उत्तम आहे. आणि हंसूं येईल तुला, पण लहानपणीं मी गोट्या फार उत्तम खेळायचा. म्हणजे काय ? नेम फार चांगला आहे माझा.

**सुलभा**—हं.

**प्रभाकर**—पण बुवा एक काळजी वाटते मला. एकदां का मला शिकारीचा नाद लागला कीं घरांत लक्ष राहायचें नाहीं माझें. आणि मग अशी रागावशील तूं कीं माझीच शिकार व्हायचा प्रसंग यायचा ! बाकी तसेंच पाहिलें तर माझी शिकार तूं केव्हाच केली आहेस म्हणा !

**सुलभा**—हं.

**प्रभाकर**—बाकी बायकांना नवरे अगदीं मुठींत राहायला हवे असतात. त्या बाबतींत त्यांना भागीदारी खपत नाहीं. आपल्या नवऱ्याची 'company' अगदीं 'private' आणि 'unlimited' हवी असते त्यांना. ( मोठ्यानें हंसतो. )

**सुलभा**—हं.

**प्रभाकर**—अग, हं काय ? मी काय बोललों तें समजलें का तुला ? तुम्ही बायका म्हणजे अशाच. कांहीं सूक्ष्म कोटि अगर विनोद केला कीं तो अगदीं तुमच्या डोक्यावरून जायचा. शिकार अगदीं हुकायचीच, अं ?

**सुलभा**--'.

**प्रभाकर**--परत आपलें 'हं'. ( आवाज चढवून ) म्हणजे ? लक्षच नाहीं कीं काय तुझें माझ्याकडे ? मी हवेशीं बोलतोंय कीं काय ? कीं त्या समोरच्या कपाटाशीं ? माझें बोलणें म्हणजे मूर्खाची कंटाळवाणी बडबड वाटली कीं काय तुला ?

**सुलभा**—नाहीं, तसें नव्हे. माझें लक्ष आहे तुमच्या बोलण्याकडे. शिकारीला जायच्या गोष्टी बोलत होतां ना तुम्ही ? रागावूं नका गडे !

**प्रभाकर**—म्हणे 'रागावूं नका गडे !' एकाद्याच्या थोबाडांत वहाणेनें मारावें आणि म्हणावें 'रागावूं नका गडे !'

**सुलभा**--शपथ आहे माझी...

**प्रभाकर**--बस्स ! एक शब्दहि ऐकून घ्यायचा नाहीं मला आतां. आज वर्षानुवर्षें पाहतोंय मी. नेहमीं तूं माझी अशीच हेटाळणी करीत असतेस, उपेक्षा करीत असतेस, माझा अपमान करीत असतेस. माझें बोलणें ऐकून घेण्याइतकी देखील किंमत त्याला द्यावी असें तुला वाटत नाहीं. मी-मी सगळा पगार तुझ्या स्वाधीन करतों, सारखी तुझी हौस पुरवीत असतों, सारखा-सारखा तुझाच विचार करीत असतों आणि त्याचा मोबदला तूं मला असा देतेस ? ठीक आहे. हें देखील मला सहन केलेंच पाहिजे. कारण तुझ्यावर प्रेम करण्याचा गाढवपणा मी करतोंय ना ?

**सुलभा**—शपथ आहे माझी तुम्हांला. उगीच असें कांहीं तरी बोलूं नका. माझें चुकलें, अगदीं खरेंच चुकलें. तुम्ही माझ्याशीं येवढ्या प्रेमानें बोलत असतांना मी कसला तरी भलताच विचार करीत बसलें.

**प्रभाकर**—पण सांग, तुला काय हवंय कीं जें मी देऊं शकत नाहीं ? अशी दूर दूर का राहतेस नेहमीं माझ्यापासून ? मला हवा तसा चहा करून देतेस, हवें तसें खायला देतेस, आपलें शरीर मला देतेस, आणि आपलें हृदय मात्र मला कां देत नाहींस ?

**सुलभा**--खरेंच गडे ! रागावूं नका ! मी अगदीं वेडी आहें. तुम्ही माझ्यावर किती प्रेम करतां ! एकाद्या फुलाप्रमाणें मला जपतां. माझी प्रत्येक इच्छा पुरी करण्याकरितां किती झटतां ! आणि मी








मात्र तुम्हांला सुख देत नाहीं ! पण तुमची शपथ घेऊन सांगतें कीं माझ्याकडून सगळा सगळा प्रयत्न करतें मी. तुम्हांला चहा कसा हवा, आंघोळीला पाणी कसें हवें, तें सारें सारें लक्षांत ठेवून मी तसें तुमचें करीत असतें. सारखा, तुम्हांला सुख कसें लाभेल याचाच विचार करीत असतें; पण कधीं कधीं मेलें मन भरकटतें कुठें तरी, आणि.....आणि.... ! फार फार वाईट आहें नाहीं मी ? ( रडूं लागते. )

**प्रभाकर**—सुलभा, सुलभा, वेडे, रडूं नको. माझी शपथ आहे तुला. मीच मूर्ख आहें, झालें. येवढ्या तेवढ्या कारणावरून मी उगीचच चिडतों आणि वाटेल तसें फडाफड बोलतों. उगीचच तुला दुःख देतों मी !

**सुलभा**—हं, आतां असें नाहीं बोलायचें. स्वतःकडे वाईटपणा नाहीं घ्यायचा. मी रडलें म्हणून तुम्हीं चूक ठरलां वाटतें ? आम्हां बायकांची ही मोठी लबाडी असते. आम्ही रडायला लागलों म्हणजे पुरुष बिचारे विरघळतात ! आणि मग चूक लपविली जाते. खरें म्हटलें म्हणजे तुम्हीं फोडूनच काढलें पाहिजे मला, काठी घेऊन.

**प्रभाकर**—चल ! असें उगीच वेड्यासारखें नको बोलूं. तूं फार गोड आहेस ग, सुलभे ! पण खरेंच सांग, तूं माझ्याजवळून कांहीं तरी लपवून ठेवते आहेस असें मला सारखें कां वाटतें ? तुझ्याजवळ कांहीं तरी मोलाचें आहे आणि तूं तें मला देत नाहींस. तूं पूर्णपणें माझी कधींच होणार नाहींस का ?

**सुलभा**—मी तुमची नाहीं तर दुसऱ्या कोणाची आहे ? आणि माझ्याजवळ मोलाचें असें काय असणार ? मी का विद्वान् आहें, का कलावंत आहे ? साधी संसारी स्त्री मी ! जेवढें देतां येईल तेवढें सगळें मला तुम्हांलाच द्यायचें आहे. तुम्हांला आणखी कांहीं हवें असलें तर तें अधिकारानें आणि हक्कानें मागा. जिवाची कुरवानी करून मी तें तुम्हांला देईन.

**प्रभाकर**—खरेंच ! काय हवंय वरें, मला ? मी कां उगीचच तुझ्यावर रागावतों ? कीं कांहींच नकोय मला ? नुसता हावरेपणा आहे कीं काय हा माझा ? सुलभा ! आपल्या लग्नाला आतां सात वर्षें झालीं. आतां मानापमान, आडपडदे ह्यांच्या पलीकडे आपण गेलों आहों. म्हणून सांगतों कीं माझें तुझ्यावर अपरंपार प्रेम आहे. तूं मला सोडून जाऊं लागलीस तर मी तुझ्यापुढें कुत्र्यासारखा लाचार होईन. मी इतका स्वार्थी आणि आधाशी आहे कीं... ... ...

**सुलभा**—शी, शी ! असलें नाहीं कांहीं बोलायचें. तुम्ही असें बोलायला लागलां कीं माझ्या मनाला घरें पडतात. सारखें वाईट वाटत राहतें. खरेंच मी पुनः नाहीं कधीं असें करणार.

**प्रभाकर**—बरें, बरें. राहूं दे तो विषय. त्या विषयावर बोलायला लागलों कीं आपण वेडीं होतों अगदीं. पण खरें सांग, कसला विचार करीत होतीस तूं !

**सुलभा**—विचार कसला आलाय ? कांहीं तरी मनाचा चाळा चाललेला असतो, झालें !

**प्रभाकर**—तरी पण कळूं दे ना मला तुझ्या मनाचा चाळा ? सांग ना कसला विचार करीत होतीस तें ?

**सुलभा**—कसें सांगायचें आणि काय सांगायचें ? खरोखर त्यांत काय आहे सांगण्यासारखें ?

**प्रभाकर**—सांग. सांग.

**सुलभा**—कसल्या तरी कल्पनांच्या लाटांवर तरंगत तरंगत मी दूर जात होतें. किल्लावरची राणी आणि चौकटचा राजा उदबत्तीच्या धुराच्या झुलत्या कमानीवर बसून फिरायला निघालीं होतीं...... ! विश्वासला गोष्ट सांगायचें कबूल केलें आहे ना ?

**प्रभाकर**—हात् तुमची ! हाच का विचार करीत होतीस ? मला वाटलें कीं कांहीं तरी गहन न समजण्यासारखे विचार डोक्यांत असतील तुझ्या. ( मोठ्यानें हंसतो. ) किलावरची राणी आणि चौकटचा राजा फिरायला जातात काय ? बाकी असल्याच कांहीं तरी गोष्टी सांगाव्या लागतात मुलांना. मुलें म्हणजे विचित्र असतात मोठीं ! आणि तूंसुद्धां लहान मूलच आहेस कीं ? ह्यापुढें अगदीं साध्या घरगुती गोष्टीच बोलेन मी तुझ्याशीं. म्हणजे मग तुला कंटाळा तूं यायचा नाहीं. अशी मनांतल्या मनांत कुढायची नाहींस.

**सुलभा**—तसा नव्हे, तसा नव्हता माझ्या विचारांचा अर्थ; निराळाच कांहीं तरी होता. थांबा, मी सांगतें तुम्हांला.








**प्रभाकर**–फार फार गोड आहेस सुलभा, तूं. परत आपल्यावरच दोष घेण्याचा प्रयत्न करतेस ना ? पण मी नाहीं तें ऐकून घेणार आतां.

**सुलभा**—पण माझें ऐकून तरी घ्या ना एकदां ? आतां अगदीं कंठापर्यंत आलें आहे तें सांगून टाकतें, म्हणजे मन मोकळें तरी होईल.

**प्रभाकर**—छे. बोलूनच देणार नाहीं मी तुला आता. असें तोंड बंद करून ठेवीन. आणि आतां अगदीं तुझ्या मनासारखें वागेन, बोलेन. हवे आहेत कोणाला ते जाडे जाडे आणि कंटाळवाणे विषय ? आणि हा बोनस मिळाला ना, म्हणजे तुला हवें आहे तसलें ड्रेसिंग टेबल आणून देईन मी तुला. कीं आरशाचें कपाटच हवें तुला ?

**सुलभा**— हं. .........

**प्रभाकर**— लागलीस वाटतें तूं परत दूरवर पाहायला आणि नखांवर रेघोट्या काढायला ? वेडीच आहेस कीं ! आणि हें काय ? परत डोळ्यांतून पाणी कां येतंय तुझ्या ?.........

---

"प्रत्येक राष्ट्राची एक विशिष्ट संस्कृति असते. तिच्यातूनच त्या राष्ट्राचें सामर्थ्य उगम व विकास पावतें. आपली संस्कृति ही सजीव आहे, आपल्या भूमीशीं ती एकजीव आहे. तिच्याभोंवतीं आपला इतिहास, आपले प्रमुख विचार गुंफलेले आहेत. एकदां आपल्या कित्येक सुशिक्षितांनीं पाश्चात्यांचें पोशाख, आचारविचार, या बाबतींत अंधानुकरण करण्याचा प्रयत्न केला ; अजूनहि कांहीं त्या फंदांत आहेत. परंतु परकीय संस्कृति स्वतःवर व इतरांवर लादण्याचे त्यांचे हे प्रयत्न विफल झाले आहेत. त्यांनीं जेव्हां भारतीय संस्कृतीचीं मूल्यें प्रत्यक्ष आचरणांत आणून आत्मोन्नति साधण्याचा प्रयत्न केला तेव्हांच त्यांना स्वत्वाची ओळख पटून खरें समाधान लाभलें आणि ते सामाजिक जीवन ओजस्वी करूं शकले... श्री. अरविन्द यांची विद्यार्थिदशा इंग्लंडांतच व्यतीत झाली. त्या विद्यार्थिदशेंत त्यांनीं पाश्चात्य संस्कृतींतील उत्तम भाग आत्मसात् करून घेतला. पण लवकरच त्यांचेवर भारतीय संस्कृतीनें आपला प्रभाव पाडला. नंतर भारतीय संस्कृतीप्रमाणें विशिष्ट अशी जीवन-साधना त्यांनीं स्वीकारिली तेव्हांच त्यांनीं भारतांत चैतन्य निर्माण केलें आणि ते आधुनिक राष्ट्र–वादाचे महर्षि, एक मोठे तत्त्वचिंतक आणि योगी बनले. गांधीजींनीं देखील बॅरिस्टरीचें शिक्षण इंग्लंडमध्यें घेतलें. पण त्यांचें अंतर्मन पाश्चात्य संस्कृतींत रमलें नाहीं. जेव्हां त्यांनीं भारतीय संस्कृतीचीं मूलतत्त्वें पुनः आत्मसात् केलीं तेव्हांच ते पुनरुज्जीवित भारताचे शिल्पकार बनले, त्यांनीं पाश्चात्य संस्कृतीशीं सामना दिला आणि ते नवनवोन्मेषशाली चिच्छक्तीचे एक अग्रगण्य कलाकार बनले."

—**श्री. कन्हैयालाल मुनशी**, कलकत्ता–विद्यापीठ, २०।३।४८, दीक्षान्त–भाषणामधून ( अनुवादरूपानें. )








# सोव्हिअेट रशियाचें परराष्ट्रीय धोरण

श्री. गो. मा. कुलकर्णी

राजकीय निरीक्षकांच्या मतें तिसऱ्या महायुद्धाचे वारे वाहूं लागले आहेत. हें मत पुष्कळ अंशांनीं खरें आहे. युद्धकालांत फॅसिझम्‌विरुद्ध लढतांना कम्युनिस्ट रशिया व भांडवलदार लोकशाह्या यांच्यांत मैत्री निर्माण झाली होती व त्या उत्साहाच्या भरांत संयुक्त–राष्ट्रसंघाची स्थापना धडाक्यानें करण्यांत आली. परंतु कम्युनिझम्‌ आणि लोकशाही यांचा समान शत्रु एकदां गारद झाल्यानंतर मात्र वातावरण बदलायला लागलें. दोस्त राष्ट्रें आणि रशिया यांच्यांत वारंवार मतभेद उत्पन्न व्हायला लागले. सुरक्षासमितींत कोणताहि ठराव पास होणें कठिण होऊन बसलें. रशियानें आतांपर्यंत आपला 'व्हीटो'-चा अधिकार बावीस वेळां वापरला आहे ! आणि अशा तऱ्हेनें संयुक्तराष्ट्रसंघाचा बोजवारा उडणार असल्याचीं चिन्हें दिसत आहेत. साहजिकच संयुक्त–राष्ट्रसंघ निर्बळ आणि निष्प्रभ झाल्यानंतर विवाद्य प्रश्न शस्त्रबळानेंच सोडविले जाणार हें उघड आहे. म्हणून राजकीय निरीक्षकांच्या मतें तिसरें महायुद्ध जवळ येत आहे.

या तिसऱ्या महायुद्धाचें मूळ कारण म्हणजे दोन परस्पर–विरोधी तत्त्वज्ञानांचा संघर्ष : कम्युनिझम्‌ आणि भांडवलप्रधान लोकशाही. निरीक्षकांच्या मतें कम्युनिझम्‌ आक्रमक आहे व तोच तिसरें महायुद्ध जगावर लादीत आहे. तेव्हां अशा परिस्थितींत सोव्हिएट रशियाच्या परराष्ट्रीय धोरणाची छाननी करणें समयोचित ठरणार आहे.

रशियाच्या परराष्ट्रीय धोरणाचा विचार करतांना कांहीं गोष्टी लक्षांत ठेवणें आवश्यक आहे. पहिली महत्त्वाची गोष्ट म्हणजे सबंध भांडवलशाही जगांत रशिया एकटाच कम्युनिस्ट देश आहे. दुसरें, अशा प्रकारें विरोधी राष्ट्रांच्या मेळाव्यांत आपली सुरक्षितता पाहणें हें त्याचें मुख्य कर्तव्य बनलें. म्हणून रशियाचें परराष्ट्रीय धोरण स्वसंरक्षण आणि ध्येय (आंतरराष्ट्रीय क्रांति) या दोन गोष्टींवर आधारलेलें आहे हें नेहमीं लक्षांत ठेवलें पाहिजे.

सोव्हिअेट रशियाच्या परराष्ट्रीय धोरणाचा अभ्यास पुढीलप्रमाणें पांच कालखंडांतून सुलभ रीतीनें करतां येतो:—

## पहिला कालखंड : १९१७ ते १९३२

या कालखंडांतलीं पहिलीं पांच वर्षें अंतर्गत युद्धें, परराष्ट्रांकडून हस्तक्षेप आणि कम्युनिझम्‌ची स्थापना यांत गेलीं. कम्युनिस्ट पुढाऱ्यांनीं सर्व शेजारच्या राष्ट्रांशीं तह केले. अंतर्गत स्थैर्याकडे लक्ष द्यावयाचें असल्यामुळें त्यांनीं अतिशय लाजिरवाण्या तहाच्या अटी सुद्धां मान्य केल्या. जर्मनीशीं ब्रेस्ट–लिटॉव्ह्स्क येथें झालेला तह रशियाला फार अपमानास्पद होता. पण स्वसंरक्षण आणि कम्युनिझम्‌ची स्थापना यांपलीकडे त्या वेळेस बोल्शेव्हिक्‌ मुत्सद्द्यांनीं लक्ष दिलें नाहीं. नसानसांतून क्रांतीचें रक्त उसळत असल्यामुळें झारशाही, आणि केरेन्स्की सरकार यांच्या कारकीर्दीतलें सर्व कर्ज बोल्शेव्हिक्‌ सरकारनें झुगारून दिलें. यामुळें अमेरिका, इंग्लंड आणि फ्रान्स या राष्ट्रांतून संतापाची लाट उसळली.

या पांच वर्षांनंतर क्रांतीचा उन्माद ओसरून जाऊन रशियन मुत्सद्दी अधिक वास्तववादी झाले. १९२४मध्यें लेनिनचा मृत्यु झाला. आणि त्यानंतरचीं तीन वर्षें स्टॅलिन आणि ट्रॉट्स्की यांच्या








झगड्यांत गेली. हा झगडा तात्त्विक असला तरी वैयक्तिकहि होता. ट्रॉट्स्कीचें म्हणणें कीं, आंतरराष्ट्रीय क्रांति घडवून आणून सर्वत्र कम्युनिझम्‌ची स्थापना करावी, तरच रशियांत कम्युनिझम् टिकूं शकेल. स्टॅलिनच्या मतें आधीं रशियांत कम्युनिझम् स्थिर व मजबूत करावा आणि मग जागतिक क्रांतीचें काय करावयाचें तें पाहावें. त्या झगड्याचा शेवट ट्रॉट्स्कीची कम्युनिस्ट पार्टींतून १९२७मध्यें व नंतर देशांतून हकालपट्टी होण्यांत झाला. आणि स्टॅलिनला पूर्ण मैदान मोकळें झालें.

स्टॅलिनच्या नेतृत्वाखालीं रशियानें मैत्रीचें धोरण स्वीकारलें. सर्व राष्ट्रांशीं पूर्वीच मैत्रीचे व तटस्थतेचे करार करण्यांत आले होते. इंग्लंडनें १९२१मध्येंच कम्युनिस्ट सरकारला व्यवहारी मान्यता ( de facto recognition) दिली होती, तिला १९२४मध्यें कायदेशीर स्वरूप देण्यांत आलें. फ्रान्स, इटली, जपान आणि इझन छोटीं राष्ट्रें यांनीं १९२७-पर्यंत इंग्लंडचा कित्ता गिरविला. अतिपूर्वेकडे सुद्धां रशियानें तेंच शांततेचें धोरण स्वीकारलें. १९२५-मध्यें जपाननें रशियाला मान्यता दिली आणि रशियाचा सर्व प्रदेश मोकळा केला. त्याच्या मोबदल्यांत रशियानें तेल आणि मच्छीमारी यांच्या सवलती जपानला दिल्या. १९२४मध्यें चीनशीं एक करार करण्यांत येऊन चायनीज ईस्टर्न रेल्वे(Chinese Eastern Railway)च्या व्यवस्थेंत संयुक्त मालकी रशियानें अंमलांत आणली. कुओमिंटांग पक्षाला रशियानें पूर्ण पाठिंबा दिला. पण १९२७मध्यें सोव्हिअेट सल्लागारांना कुओमिंटांग पक्षानें काढून लावलें.

पोलंड आणि रुमानिया यांसारख्या कमकुवत राष्ट्रांशीं सुद्धां रशियानें भांडणाचे प्रसंग टाळले. रुमानियानें रशियाचा बेसरेबिया हा प्रांत घेतला. आणि रिगा–तह( Treaty of Riga )नें पोलंडला युक्रेनचा बराच भाग मिळवून दिला. परंतु रशियानें या सर्व गोष्टींना विरोध न करतां मूक संमति दिली. १९२४मध्यें झिनॉव्हीव्ह पत्रामुळें इंग्लंडशीं आणि १९२९–३०-मध्यें फ्रान्सशीं रशियाचें थोडेंसें खटकलें होतें; पण तेवढ्यावरच निभावलें. एकूण रशियानें आपलें शांततेचें धोरण कसोशीनें पाळण्याचा प्रयत्न केला.

## दुसरा कालखंड : १९३३ ते १९३८

१९३३मध्यें नाझी पक्ष जर्मनींत अधिकारावर येतांच लोकशाही राष्ट्रांप्रमाणेंच रशियापुढेंहि नवीन प्रश्न उभे राहिले. कम्युनिझम्‌ला गाडून टाकण्यास सिद्ध झालेल्या नाझीझम्‌मुळें रशियाला आपल्या धोरणांत पुनः बदल करावा लागला. जपानच्या भीतीमुळें अमेरिकेनेंहि रशियाला १९३३मध्यें मान्यता दिली. तटस्थतेच्या व मैत्रीच्या करारांची घाई सुरू झाली. २९ नोव्हेंबर १९३२ रोजीं करण्यांत आलेल्या फ्रँको–सोव्हिएट–अनाक्रमणाच्या कराराच्या जोडीला ११ जानेवारी १९३४ रोजीं व्यापारी करार करण्यांत आला. पोलंड आणि बाल्टिक राष्ट्रें यांशीं केलेल्या अनाक्रमणाच्या करारांची मुदत १९४५पर्यंत वाढविण्यांत आली. तुर्कस्थान आणि इंग्लंड यांच्यांशीं निकटचे संबंध जुळविण्यांत आले. आणि महत्त्वाचा उपाय म्हणून १८ सप्टेंबर १९३४ रोजीं रशिया राष्ट्रसंघाचा (League of Nations्चा) सभासद झाला. बर्लिनशीं अनाक्रमणाचा करार करण्याचें आणि जर्मनीला ' ईस्टर्न लोकॅर्नो '-( Eastern Locarno )मध्यें सामील करण्याचे सर्व प्रयत्न अयशस्वी झाले. लिटव्हिनॉव्हनें फ्रान्स आणि ' लिटल एन्टेंट ' राष्ट्रांशीं ( म्हणजे झेकोस्लोव्हाकिया, रुमानिया, युगोस्लाव्हिया यांशीं ) परस्पर–संरक्षणाच्या मदतीचा प्रयत्न केला. पॅरिस आणि मॉस्को यांमध्यें २ मे १९३५ रोजीं परस्पर–मदतीचा करार झाला, आणि १६ मे १९३६ या दिवशीं प्रेगनें कित्ता गिरवला. रशियानें टोकियोशीं अनाक्रमणाचा करार करण्याचे निष्फळ प्रयत्न अनेकदां केले. स्वतःच्या मित्रभावनेची खात्री पटविण्यासाठीं Chniese Eastern Railway रशियानें मांचूकुओ सरकारला मार्च १९३५मध्यें विकून टाकली; आणि १९३६-मध्यें, जपानला देण्यांत आलेल्या, मच्छीमारीच्या आणि तेलाच्या सवलती वाढविण्याचा प्रस्ताव केला. १९३५च्या उन्हाळ्यांत कम्युनिस्ट इंटरनॅशनल कॉंग्रेसनें आपली जागतिक क्रांतीची घोषणा बदलून फॅसिझम्–विरोधी संघटनेची आरोळी ठोकली.








## सोव्हिएट रशियाचें परराष्ट्रीय धोरण

तशांत १९३६मध्यें जपान आणि जर्मनी यांच्यामध्यें कम्युनिस्टविरोधी करार झाला. म्हणून रशियानें आपल्या पूर्वेकडील भागाची तटबंदी आणि नाकेबंदी करून सैन्यांत व आरमारांत वाढ केली.

११ मार्च १९३८ रोजीं हिटलरनें ऑस्ट्रिया गिळंकृत केला. मे १९३८पासून झेकोस्लोव्हाकियांत नाझी कारस्थान सुरू झालें. ब्रिटिश पंतप्रधान मि. चेंबरलेन यांच्या जर्मनीच्या वाऱ्या सुरू झाल्या. हिटलरपुढें इंग्लंडनें नमतें घेण्याचें ठरविलें होतें. फ्रान्सला इंग्लंडशिवाय आधार नव्हता. त्यामुळें फ्रेंच पंतप्रधान ब्रिटिश पंतप्रधानाच्या मर्जीनुसार वागत होता. इंग्लंडनें जर्मनीशीं आरमारी करारहि केला होता. ३० सप्टेंबर १९३८ रोजीं करण्यांत आलेल्या कुप्रसिद्ध म्युनिक ठरावाच्या वेळीं सुद्धां रशियाची संमति इंग्लंड–फ्रान्सनीं विचारली नाहीं. या सर्व गोष्टींमुळें रशियाच्या मनांत पश्चिमी लोकशाही राष्ट्रांविषयीं संशय उत्पन्न होऊन जर्मनीविषयींच्या धोरणांत हळूहळू बदल होऊं लागला.

### तिसरा कालखंड : १९३९ ते १९४१

या कालखंडांत स्वसंरक्षण हेंच रशियाचें मुख्य ध्येय होतें. इंग्लंडचें धरसोडीचें धोरण, फ्रान्सचें इंग्लंडवर अवलंबून राहणें व अमेरिकेचा मन्रो डॉक्ट्रिन ( Monroe Doctrine ) यांमुळें रशियाला आपलें स्वतंत्र धोरण आंखणें प्राप्त होतें. राष्ट्रसंघाचें नपुंसकत्व आणि संयुक्त संरक्षणाचें अपेश यांत भर म्हणून रोम–बर्लिन–टोकिओ–ॲक्सिस. येवढीं कारणें रशियाला आपल्या धोरणांत सपशेल बदल करण्याला पुरेशीं होतीं. १९३९ सालच राजकीय आश्चर्यांनें भरलेलें होतें. स्वसंरक्षणाच्या उत्कट भावनेमुळें रशियानें आपल्या निर्घृण वैऱ्याशींहि दोस्तीचा करार करण्याला मागेपुढें पाहिलें नाहीं. २४ ऑगस्टच्या सकाळीं रूसो–जर्मन अनाक्रमणाच्या कराराची भयंकर बातमी ऐकण्यासाठीं जग जागें झालें. नाझी जर्मनी आणि कम्युनिस्ट रशिया यांच्यांत अनाक्रमणाचा करार झाला.

त्या करारानंतर रशियानें आपली शक्ति वाढविण्याला सुरुवात केली. युरोप आणि आशिया या दोन सरहद्दींवर युद्ध टाळण्याचा प्रयत्न रशियानें केला. जपानशीं १९४०मध्यें अनाक्रमणाचा करार यासाठींच करण्यांत आला.

१ सप्टेंबर १९३९ रोजीं जर्मन सेना पोलंडच्या हद्दींत शिरली आणि तिसऱ्या महायुद्धाला सुरुवात झाली. पूर्वेकडे जर्मन सेना जात आहे तोंच लाल सेनेनें १६ सप्टेंबर रोजीं पोलिश हद्दींत शिरून श्वेत रशियाचा मुलूख चपळाईनें व्यापून टाकला. जर्मनीनें जो जो देश काबीज केला त्यापैकीं पूर्वींचा रशियाचा असलेला भाग रशियानें व्यापून टाकला. रुमानियापासून बेसारेबिया घेतला आणि आलंड बेटासाठीं फिनलंड काबीज केलें. अशा प्रकारें या काळांत १९१४पूर्वींच्या सर्व सरहद्दी रशियानें व्यापून टाकल्या.

### चौथा कालखंड : १९४१ ते १९४५

रूसो–जर्मन मैत्रीचा तापदायक काल फार वेळ टिकला नाहीं. २१ जून १९४१ रोजीं हिटलरनें अनाक्रमणाच्या कराराचा भंग करून अकस्मात् रशियावर हल्ला चढविला. त्यामुळें दोस्त राष्ट्रें आणि रशिया यांच्यांत अेकदम हातजमाई झाली आणि संयुक्त आघाडी फॅसिझमविरुद्ध उभारण्यांत आली. त्या काळांत सुद्धां स्वतःचा बचाव करण्याचेंच मुख्य ध्येय रशियापुढें होतें आणि त्याकरतां त्यानें शक्य ते सर्व प्रयत्न केले. जागतिक क्रांतीचा नाद सोडल्याचा पुरावा म्हणून कॉमिंटर्नचें सुद्धां १९४३मध्यें विसर्जन करण्यांत आलें. संबंध युद्धकाळांत दोस्त राष्ट्रें आणि रशिया यांच्यांत एकी टिकून राहिली. लाल सेना प्राण पणाला लावून लढल्यामुळेंच बर्लिनचा ८ मे १९४५ रोजीं पाडाव झाला आणि युरोपांतून फॅसिझमचा तात्पुरता तरी नायनाट झाला. दोन आघाड्यांवर न लढण्याच्या धोरणाला अनुसरून रशियानें पॅसिफिकमध्यें मात्र संपूर्ण तटस्थता संबंध युद्धकालांत राखली होती.

याच काळांत रशियानें दोस्त राष्ट्रांबरोबर सर्व प्रकारच्या परिषदांतून भाग घेतला. मॉस्को व तेहरान येथील लष्करी, योजनांपासून पॉट्स्डॅम, डंबार्टन ओक्स, माल्टा आणि सॅनफ्रॅन्सिस्को येथील शांततापरिषदेपर्यंत सर्व कार्यक्रमांत रशियानें सहकार्य केलें, पुढाकार घेतला. फॅसिझम्‌चीं पाळेंमुळें खणून काढ-








ण्याची आणि शांतता प्रस्थापित करण्याची प्रतिज्ञा सर्वांनी मिळून केली. सॅनफ्रॅन्सिस्को–कॉन्फरन्समध्यें (२५ अेप्रिल ते २६ जून १९४५) या प्रतिज्ञेला मूर्त स्वरूप देण्यासाठीं संयुक्त-राष्ट्रसंघाची स्थापना करण्यांत आली. महत्त्वाची गोष्ट ही कीं ज्या क्षणीं संयुक्त–राष्ट्रसंघाची स्थापना झाली त्याच क्षणापासून रशिया व इतर पाश्चिमी राष्ट्रें यांच्यांत भेद व्हायला लागला. रशियाची संशयी वृत्ति उसळून आली व त्याला सुरक्षा–समितींत आणण्यासाठीं व त्याची भीति आणि त्याचा संशय दूर करण्यासाठीं पांच बड्या राष्ट्रांना व्हीटोचा अधिकार देण्यांत आला आणि येथपासूनच पूर्व आणि पश्चिम यांमधील मतभेद वाढीस लागले.

## पांचवा कालखंड : १९४६ ते आज–तागायत

१९४६च्या जानेवारीमध्यें सुरक्षासमितीवरील सहा बदलत्या (non-permanent) राष्ट्रांची निवडणूक झाली. आणि फेब्रुवारीमध्यें मि. ट्रिग्वे ली यांची सेक्रेटरी–जनरल म्हणून नेमणूक होऊन संयुक्त–राष्ट्रसंघटनेच्या कामाला सुरुवात झाली. शांतता स्थापन करण्याच्या प्रश्नावर सर्वांचें एकमत असलें तरी कार्यपद्धति व इतर आचार–विचार यांसंबंधीं रशिया आणि दोस्त राष्ट्रें यांच्यांत विरोध उत्पन्न झाला. लंडन–कॉन्फरन्स, पॅरिसची शांतता–परिषद्, मार्शल–योजना इत्यादि गोष्टी या वैमनस्याच्या निदर्शक आहेत. अमेरिकेच्या युरोपमधील वाढत्या वजनाला आळा घालण्यासाठीं फ्रान्स, इटली आदिकरून मध्य व पश्चिम युरोपांतील नऊ देशांतल्या कम्युनिस्ट पक्षानें आपली एक संघटना निर्माण केली व बेलग्रेड येथें माहिती–खात्याची कचेरी उघडण्यांत आली. या संघटनेला नवी कम्युनिस्ट इंटरनॅशनल समजून पाश्चिमी राष्ट्रांत खळबळ आणि असंतोष निर्माण झाला. इंग्लंड व अमेरिका यांचें अनुकरण करून रशियानें आजूबाजूच्या राष्ट्रांत आपलें वर्चस्व वाढविण्याला सुरुवात केली. संयुक्त–राष्ट्रसंघटनेंत ब्रिटिश कॉमनवेल्थइतकीं मतें आपणाला असावीं म्हणून रशियानें यू. एस. एस. आर.मधून घटकराज्यांना फुटून निघण्याची मोकळीक दिली व अशा प्रकारें तीन जादा मतें मिळविलीं.

संयुक्त–राष्ट्रसंघटनेपुढें येणाऱ्या प्रत्येक प्रश्नावर रशिया आणि इंग्लंड–अमेरिका यांच्यांत मतभेद दिसून येतो. आतांपर्यंत रशियन प्रतिनिधींनें बावीस वेळां आपला व्हीटोचा अधिकार वापरला आहे. फक्त पॅलेस्टाइनच्या प्रश्नावर काय तें अेकमत झालें होतें. पण तेंहि अमेरिकेनें नंतर आपलें धोरण बदलल्यामुळें नाहींसें झालें. मंगोलिया, ट्रीस्ट, अझरबैजान, ट्रान्सजोर्डानिया, पर्शिया इत्यादि सर्व विवाद्य कूटस्थलांसंबंधीं रशियानें आपलें स्वतंत्र धोरण स्वीकारलें आहे. या व्हीटोच्या उपयोगामुळें त्रस्त होऊन आणि रशियाचें वर्चस्व झुगारून देतां यावें म्हणून 'छोटी राष्ट्रसंघटना' दोस्तांनीं निर्माण केली आहे.

रशियानें आपलें वजन आजूबाजूच्या राष्ट्रांत खूप वाढविलें आहे. चार बाल्टिक राष्ट्रें, पोलंड, झेकोस्लोव्हाकिया, हंगेरी, रुमानिया, युगोस्लाव्हिया इतकीं राष्ट्रें रशियाच्या प्रभावळींत आहेत. ऑस्ट्रिया, इटली व ग्रीस यांना घशांत टाकण्याच्या विचारांत सध्यां मॉस्को आहे. खास रशिया सोडून नऊ कोटी लोकसंख्या आणि साडेपांच लक्ष चौरस मैल प्रदेश सध्यां रशियाच्या वर्चस्वाखालीं आहेत. इटलीमध्यें नुकत्याच निवडणुकी होऊन ख्रिश्चन–डेमॉक्रॅटिक पक्ष बहुसंख्येनें निवडून आला व कम्युनिस्टांची हार झाली. यामुळें रशियामध्यें बेदिली उत्पन्न झाली असून परराष्ट्रमंत्री मोलोटोव्ह यांना परत बोलावलें जाईल असा अंदाज आहे. बर्लिनमध्येंहि रशिया व इतर दोस्त यांमध्यें बेबनाव झाला असून फौजी हालचाली सुरू झाल्या आहेत. चीनमध्यें कम्युनिस्टांनीं धुमाकूळ मांडलाच आहे. जपान गेलें तरी चीन भांडवलशाही राष्ट्रांच्या ताब्यांत जाऊं न देण्याचा रशियाचा निश्चय दिसतो.

## रशिया तिसरें महायुद्ध जगावर लादणार काय?

रशियाचें सध्यांचें धोरण व यशापयश पाहिल्यास युद्धमार्गाचा रशिया इतक्या घाईनें अवलंब करील असें वाटत नाहीं. अमेरिकेच्या सहापट रशियाची अधिक तयारी असूनहि युद्ध पुकारण्यापूर्वीं सर्व मार्गांचा रशिया पाठपुरावा करील. सध्यां सबंध मध्य-युरोप रशियाच्या वर्चस्वाखालीं आहे, आणि हें










वर्चस्व युद्धाविना रशियानें मिळविलें आहे. पूर्व आणि मध्य युरोपांतील छोटीं छोटीं राष्ट्रें आपण होऊन मॉस्कोकडे गेलीं. जगांतील इतर राष्ट्रांत, खुद्द हिंदुस्थानांत सुद्धां, कम्युनिस्ट पक्षाचा जोर दिवसेंदिवस वाढत आहे. एका निरिक्षकानें म्हटल्याप्रमाणें जगाची नवी घटना कम्युनिझमूच्या वळणावर होणार अशीं चिन्हें दिसत आहेत. अशा परिस्थितींत ॲटम—बॉम्बसारखें भयंकर शस्त्र जवळ असलेल्या राष्ट्रांशीं रशिया घाईनें युद्ध पुकारून स्वतःला व आपल्या प्रभावळींतल्या इतर राष्ट्रांना आपत्तींत लोटील असें वाटत नाहीं. कालगतीनेंच कम्युनिझमूचा प्रसार आपोआप होणार असल्यामुळें विनाकारण युद्ध पुकारून कदाचित् कम्युनिझमूच्या संपूर्ण नाशाला कारणीभूत होण्याइतके सोव्हिअेट मुत्सद्दी उतावीळ आणि अदूरदर्शी नाहींत. तेव्हां अतिशय बलाढ्य असून सुद्धां युद्धाखेरीज सर्व मार्गांचा अवलंब रशिया आधीं करील. दोस्तांनींच चढाई केल्यास मात्र युद्धाशिवाय रशियाला गत्यंतर उरणार नाहीं. पण युद्ध पुकारण्यांत रशिया पुढाकार घेईल असें जें समजलें जातें तें बरोबर नाहीं.

## रशिया आणि साम्राज्यवाद

युद्धकाळांत रशियानें आपल्या सरहद्दी वाढविल्या व नंतर इतर राष्ट्रांतून आपलें वर्चस्व वाढविलें व सारखें वाढवितोच आहे. याच्या मुळाशीं साम्राज्यवाद आहे काय? रशियाच्या अेकूण वागणुकीचें विश्लेषण केल्यास काय दिसून येईल? युद्धकाळांत रशियानें आपल्या सरहद्दी वाढविल्या त्या जर्मनी आणि जपान यांच्या भीतीमुळें. पूर्वेकडील सरहद्दीची तटबंदी केली ती सुद्धां जपानच्या धास्तीनेंच. भोंवतालचीं छोटीं राष्ट्रें काबीज केलीं तीं मुख्यतः आपल्या खुद्द प्रदेशावर शत्रूचा मारा होऊं नये म्हणून. साम्राज्यवादी धोरण असतें तर रशियानें जपान व जर्मनी यांच्याशीं सलोखा केला नसता, चायनीज् ईस्टर्न रेल्वे विकली नसती, बेसरेबियाचा प्रांत रुमानियाला सोडला नसता आणि झारशाहीचें धोरणच कायम ठेवलें असतें. पहिल्या महायुद्धानंतर गमावलेले प्रदेश परत मिळविणें हेंच जर्मनी, इटली इत्यादि राष्ट्रांचें ध्येय होतें. परंतु रशियानें असें धोरण ठेवलें नव्हतें. जे जे भाग रशियापासून गेले ते कायमचेच गेले असें समजून रशियानें आपल्या आर्थिक योजनेचा आराखडा तयार केला. बेसारेबिया व श्वेत रशिया यांचा विचारच रशियानें केला नाहीं. म्हणून साम्राज्यवादाचा मुख्य पाया असे जे आर्थिक हितसंबंध, त्यांचा रशियाच्या धोरणांत अभाव दिसून येतो.

युद्धकालानंतर जें वर्चस्व इतर राष्ट्रांतून रशियानें प्रस्थापित केलें आहे तें सुद्धां स्वसंरक्षण आणि कम्युनिझमूचा प्रचार यांसाठींच. मार्शल—योजनेसारखी एकादी योजना तयार करून कायमचें आर्थिक वर्चस्व मिळविण्याचा रशियाचा प्रयत्न दिसत नाहीं.

भविष्यकाळांत रशियाचें धोरण उत्पादन—प्रमाणावर अवलंबून राहील. सध्यां रशियाचें उत्पादन-धोरण स्वयंपूर्ण होण्यापुरतेंच आहे. जादा उत्पादन करून 'मार्केट' काबीज करण्याच्या नादीं जर रशिया लागेल तर मात्र भांडवलशाही साम्राज्यवाद येईल. सध्यां रशिया आपलें वर्चस्व इतर राष्ट्रांतून वाढवीत आहे याचें कारण, त्याला त्या राष्ट्रांशीं व्यापारी संबंध जोडून व अमेरिकेसारखें भांडवल गुंतवून किंवा इंग्लंडप्रमाणें राज्य स्थापून आपलें आर्थिक वा राजकीय साम्राज्य स्थापावयाचें नसून कम्युनिझमूचा प्रसार सर्व राष्ट्रांतून करावयाचा आहे. रशियानें जागतिक क्रांतीचें धोरण अजून सोडलेलें नाहीं. तेव्हां क्रांति करावयाची म्हणजे वर्चस्व स्थापन केलेंच पाहिजे. परंतु असें वर्चस्व स्थापन करणें सुद्धां एक प्रकारचें साम्राज्यच आहे. इंग्लंडनें राजकीय व अमेरिकेनें आर्थिक साम्राज्य स्थापलें. रशियाचें साम्राज्य निर्माण होईलच तर तें या दोन्ही प्रकारांहून वेगळ्या प्रकारचें होईल. आर्थिक समतेचें ध्येय अंमलांत आणण्यासाठीं रशियाला राजकीय वर्चस्व पाहिजे आहे. बाहेरच्या राष्ट्रांतला पैसा आपल्या राष्ट्रांत आणावा असा रशियाचा हेतु दिसत नाहीं. रशियाचा स्वार्थ अेकाच गोष्टींत दिसतो. ती म्हणजे सर्व देशांतल्या कम्युनिस्ट पक्षांचें संचालन मॉस्कोहून झालें पाहिजे. पण हा आग्रह सुद्धां रशिया अलीकडे सोडीत आहे. फेब्रुवारी १९४८-मध्यें झेकोस्लोव्हाकियांत झालेल्या कम्युनिस्ट क्रांतींत रशियाचा हात नव्हता हें आतां उघड झालें आहे.








तेव्हां रशियावर साम्राज्यवादाचा आरोप करायचाच झाल्यास एका नव्या प्रकारच्या साम्राज्यवादाचा करावा लागेल. कांहीं महिन्यांपूर्वी ब्रिटिश पंतप्रधान मे. अॅटूली यांनीं जे उद्गार काढले ते याचीच साक्ष देतातः—"Soviet Russia is pursuing a policy which threatened the other nations of Europe with a new form of Imperialism—ideological, economic and strategic."

---

" आज आपल्या देशांत जर मुख्य कोणत्या एका गोष्टीवर लक्ष केंद्रीभूत व्हायला पाहिजे असेल तर ती गोष्ट म्हणजे माणमाणसांमधील व्यवहारांत संपूर्ण प्रामाणिकपणा आणि सचोटी प्रस्थापित करणें ही होय. त्या योगानेंच आपल्या राष्ट्रीय सरकारवरील ओझें शक्य तितकें कमी होईल.आपला स्वतंत्र हिंदुस्थान हा जर आपण जॉइंट स्टॉक कंपनी समजलों, तर हिंदुस्थानांतील प्रत्येक नागरिक त्या कंपनीचा भागीदार आहे आणि भागीदार या नात्यानें त्यानें आपल्या सहकारी मंडळींना आपलें उत्तम सहकार्य दिलें पाहिजे. स्वतंत्र हिंदुस्थानांतील देशभक्ताला जर कोणते गुण आचरणांत आणण्याची जरूरी असेल तर ते हे होत. १ शंभर टक्के प्रामाणिकपणा. असा कीं, कोणीं आपणांवर देखरेख वा तपासणी करण्याची जरूरच राहूं नये.२ निरलस उद्योगी वृत्ति. अशी कीं, जिच्यामुळें आपली बुद्धि, साधनें आणि वेळ हीं आपण समाजकारणीं लावूं शकूं. ३ आणि समाजोपयोगी अशा प्रत्येक प्रकारच्या कामाबद्दल आदरभाव—मग त्या कामाला शारीरिक श्रम लागोत वा बौद्धिक श्रम लागोत. हे हे तीन गुण होत. स्वातंत्र्याकरितां बाहेरील शत्रूंशीं आपला लढा संपला आहे. आतां आपली सर्व शक्ति दैनंदिन नागरिक जीवनांत नैतिक आदर्श शाबूत ठेविण्याच्या कामीं लाविली पाहिजे. "

—**श्री. च. राजगोपालाचार्य**, कुलपति, कलकत्ता–विद्यापीठ [ २०–३–४८. ]

" मी आतांपर्यंत अनेक पावसाळे पाहिले असून संसाराचें सत्यस्वरूप मला कळून आलें आहे. मला किंवा माझ्यासारख्या इतरांना या अधिकाराच्या स्थानाची सुखाच्या दृष्टीनें मुळींच किंमत वाटत नाहीं. आपण आतां स्वतंत्र झालों आहोंत. आतां आपलें सरकार झालें आहे.तेव्हां अधिकाराच्या जागेवर—मग ती जागा अत्यन्त खालची असो वा वरिष्ठ असो—कोणी तरी बसणारच. म्हणून आपले मित्र वा आप्तेष्ट यांपैकीं कोणी शिपाई, भंगी किंवा गव्हर्नर–जनरल झाला तर त्याबद्दल आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. स्वतंत्रतेमध्यें जर आपण कोणती गोष्ट शिकावयाची असेल तर ती ही कीं, झाडूवाल्याची आणि गव्हर्नर–जनरलची अशा दोन्हींहि जागा सारख्याच श्रेष्ठ आहेत. मात्र दोन्हींचेंही उद्दिष्ट लोकांची सेवा हेंच असलें पाहिजे."

—**श्री. चक्रवर्ती राजगोपालाचार्य**,
दार्जिलिंग बंगाली असोशिएशनसमोर झालेल्या भाषणांतून. २५।५।४८.










# जगताचें भवितव्य : स्वर्ग कीं श्मशानभूमि ?

श्री. वसन्त प्रभाकर पेठे

६ ऑगस्ट १९४५ रोजीं अखिल जगत् भीति आणि विस्मय यांच्या संमिश्र भावनेनें नुसतें थरारून गेलें. कारण या दिवशीं एक महाभयंकर चमत्कार झाला, एक अत्यंत क्रांतिकारक घटना घडून आली. यास मानवाच्या व शास्त्राच्या इतिहासांत तोड नाहीं. अमेरिकेनें या दिवशीं जपानचा लष्करी तळ हिरोशिमा या शहरावर अणुगोल टाकून त्या शहराचा शें. ६० भाग धुळीस मिळविला ! १००,००० जपानी जखमी झाले ! ! ६०,००० ठार झाले ! ! ! 'बिनशर्त शरणागति अथवा तात्काळ व सर्वंकष नाश हे दोनच विकल्प जपानपुढें आहेत'– ही २९ जुलै १९४५च्या दोस्तराष्ट्रांनीं जपानला धाडलेल्या अंतिमोत्तरांतील भयानक सूचना अखेर त्यांनीं खरी करून दाखविली !

अणुगोल म्हणजे वज्राघात होय. आजपर्यंतच्या युद्धांत वापरलेल्या सर्व प्रकारच्या गोलांत ब्रिटिश ग्रॅंड स्लॅम हा गोल सर्वांत मोठा व अधिक संहारक म्हणून समजला जाई. पण जपानवर टाकलेल्या अणुगोलाची शक्ति ब्रिटिश ग्रॅंड स्लॅमच्या २००० पट होती ! अणुगोलाची शक्ति इतकी महाभयंकर आहे कीं ज्या जपाननें २९ जुलैचें अंतिमोत्तर क्षणाचाहि विलंब न लावतां मोठ्या अहंकारानें धुडकावून लावलें, त्याच जपाननें आपल्या हिरोशिमा व नागासाकी या दोन शहरांवर अणुगोल पडतांच फक्त चारच दिवसांत नांगी टाकून संपूर्ण व बिनशर्त शरणागतीची केविलवाणी याचना केली ! १४ ऑगस्ट रोजीं जपानचा सम्राट् हिरोहिटो यानें सकाळीं सुप्रीम कौन्सिलची तांतडीनें बैठक घेतली व तींत त्यानें असे उद्गार काढले:– " जर युद्धाचा शेवट या क्षणींच लागला नाहीं तर जपानची राज्यव्यवस्था कोलमडून पडेल येवढेंच नव्हे तर अखिल जपानी राष्ट्राचा सर्वनाश होईल आणि मग जपानला खरीखुरी शाश्वत अशी शांतता उपभोगावयास मिळेल ! " हिरोहिटोच्या या भाषणावरून अणुगोलानें मानवजातीच्या जीवितावर व संस्कृतीवर केवढें मोठें संकट आणलें आहे हें कळून येईल.

## अणुगोलाच्या संशोधनाची शास्त्रीय व ऐतिहासिक पार्श्वभूमि

अणुगोलाच्या संशोधनामुळें सामाजिक, राजकीय व आर्थिक असे अनंत महत्त्वाचे प्रश्न* निर्माण झाले आहेत. या प्रश्नांचीं समर्पक उत्तरें मिळण्यासाठीं अणुगोलाच्या संशोधनाची थोडीशी शास्त्रीय पार्श्वभूमि व त्याचे गुणधर्म यांची आपणांस माहिती असणें अत्यवश्य आहे.

सुमारें दीडशें वर्षांपूर्वीं जॉन डाल्टन नांवाच्या शास्त्रज्ञानें प्रथम अणूसंबंधीं एक महत्त्वाचा सिद्धान्त

* 1 Atomic Energy : World Unity Booklets. No. 4, ही पुस्तिका पाहा. 2 Foreign Affairs, July 1946, p. 591–595.








प्रतिपादन केला : अणु हा निसर्गांतील कोणत्याहि वस्तूचा अंतिम घटक असून तो अभेद्य असतो, हाच तो सिद्धांत होय. या सिद्धांतानें शास्त्रीय जगतांत जवळजवळ एक शतक राज्य केलें. पण पुढें रसायनशास्त्राची झपाट्यानें प्रगति होऊन वरील सिद्धांत असत्य आहे असें दिसून आलें. अर्वाचीन शास्त्राप्रमाणें अणु हा वस्तूचा अंतिम घटक नाहीं, कारण अणूमध्येंच प्रोटॉन, न्यूट्रॉन, पॉझिट्रॉन व इलेक्ट्रॉन हे मूलघटक असतात. हे घटक विलग करून अणूचें पृथक्करण केलें तर त्यामधून विलक्षण शक्ति निर्माण होते. अशा प्रकारचें अणूंचें विच्छेदन निसर्गांत सतत होतें व त्यांतून अफाट शक्तीची निर्मिति होते, हें शास्त्रीय सत्य शास्त्रज्ञांस ज्ञात होतें. पण कृत्रिमपणें अणूंचें पृथक्करण करण्याची तांत्रिक पद्धति मात्र बरींच वर्षें शास्त्रवेत्त्यांना अवगत झाली नाहीं. युद्धकाळांत या प्रयोगांस सर्व राष्ट्रांत जोराची चालना मिळाली. जर्मनीनें अणुगोलांचें संशोधन करण्यासाठीं भगीरथ प्रयत्न केले, पण त्यांत त्याला यश आलें नाहीं. अमेरिकेनें या एका प्रकारच्या शास्त्रीय जुगारांत दोनशें कोट डॉलर्स पणाला लावले आणि शेवटीं अपूर्व असें यश संपादन केलें. आजच्या घटकेस अणुगोल निर्माण करण्याच्या पद्धतीचें तंत्र फक्त अमेरिका, इंग्लंड व कॅनडा या तीनच राष्ट्रांस ज्ञात आहे. पण मोठमोठ्या शास्त्रज्ञांचें असें मत आहे कीं इतर उद्योगप्रधान राष्ट्रांसहि याची माहिती लवकरच होईल. शिवाय अणुगोल निर्माण करावयास लागणाऱ्या युरेनियम या धातूची वाणहि कोणत्याच राष्ट्राला भासणार नाहीं. नवीनच जन्मलेल्या भूरसायनशास्त्रांतील (Geo-chemistry) पंडित असें सांगतात कीं खडकाच्या प्रत्येक टनांत १/३० औंस युरेनियम असतें. अशा रीतीनें अणुगोलासाठीं लागणारा कच्चा माल व उत्पादनतंत्र या दोनहि बाबतींत कोणत्याच राष्ट्राला भविष्यकाळांत अनुल्लंघनीय अडचणी येणार नाहींत. भावी युद्धांत सर्व लहान–महान् राष्ट्रें अणुगोलांचा वापर करतील. अर्थांतच मग अमेरिका असो अथवा बेल्जम असो, कोणाचें काय होईल याची कांहीं शाश्वती राहणार नाहीं. आणि म्हणूनच अणुगोलानें निर्माण केलेल्या प्रश्नांना जागतिक महत्त्व व तीव्र रूप प्राप्त झालें आहे.

## युद्ध कीं शांतता ?

अणुगोलानें मानवापुढें एक फार मोठें प्रश्नचिन्ह उभें केलें आहे : युद्ध कीं शांतता ? अणुगोलाची विध्वंसक शक्ति इतकी भयानक आहे कीं जर भविष्यकालांत कधीं काळीं जागतिक युद्ध पेटलें तर त्या होमकुंडांत मानवजातीच्या संस्कृतीचा कायमचा बळी पडल्याशिवाय राहणार नाहीं. याउलट अणुशक्तीचा वापर मानवानें जर विधायक कार्यासाठीं केला, तर जगताचें नंदनवन होऊन जाईल. सर्वंकष नाश किंवा स्वर्गीय सुख असे दोनच विकल्प मानवापुढें आहेत. यांपैकीं कशाची निवड मानव करील असा प्रश्न आहे.

वरील प्रश्न दिसावयास फार सोपा आहे; पण वास्तविक तो सर्व दृष्टींनीं अत्यंत गुंतागुंतीचा व अवघड आहे. आणि म्हणूनच याचें निश्चित उत्तर देणें फार कठिण आहे. निदान ज्यानें मानवजातीचा इतिहास पढला आहे व ज्यास मानवी स्वभावाची पारख आहे अशा विचारवंतानें तरी याविषयीं भविष्य करण्याचें धाडस करूं नये. गतकालांत क्षणभर नजर टाकली तर आपणांस काय दिसेल ? १८-व्या शतकांच्या उत्तरार्धांत शास्त्राची प्रगति विद्युद्वेगानें होऊं लागली. मानवाचें ऐहिक वैभव वाढविण्याच्या अनेक संधी प्राप्त झाल्या. पण या शक्तीचा उपयोग राष्ट्रांनीं कसा केला? विघातक कार्यासाठीं केला! फ्रान्सनें आपला लष्करी दरारा वाढविण्यासाठीं व जगतावर आपलें साम्राज्य प्रस्थापिण्यासाठीं इंग्लंडशीं युद्ध पुकारलें. पुढें तर युरोपांतील बहुतेक सर्व राष्ट्रें व अमेरिका, ईजिप्त, हिंदुस्थान इत्यादि देश युद्धाच्या खाईंत लोटले गेले. २० व्या शतकाची कहाणी अशीच आहे. या शतकांत तर शास्त्रानें विलक्षणच आघाडी मारली आणि याचा वापर सर्वतोपरी राष्ट्राचें व एकंदर मानवजातीचें सुख वाढविण्यासाठीं झाला असता तर आतांपर्यंत जगताचें आनंदवनभुवन झालें असतें, पण मानवाला आपला खरा स्वार्थ कळत नाहीं हेंच खरें. १९१४ व १९३९ सालीं दोन महाभयंकर जागतिक महायुद्धें पेटलीं आणि








त्यामुळें जित व जेते या दोनहि प्रकारच्या राष्ट्रांची अपरिमित हानि झाली. मानवजातीच्या आसुरी महत्त्वाकांक्षेचा, अंध प्रवृत्तींचा आणि घातक समजुतींचा हा काळा इतिहास आहे. आणि हीच परंपरा यापुढेंहि टिकणार नाहीं असें ठामपणें कोण सांगूं शकेल ? सत्यानाश दिसत असूनहि युद्धें भडकतात. शांतता टिकविण्यासाठीं ऐहिक सुखाच्या वाढीचें आमिष मानवाला पुरें पडत नाहीं. अणुशक्तीच्या रूपानें मानवाला कामधेनु प्राप्त झाली आहे. पण या कामधेनूपासून सुख व शांतता यांऐवजीं युद्ध व सर्वनाश यांचाच वर मागण्याचा मूर्खपणा मानव करणार नाहीं असें खात्रीपूर्वक सांगतां येणें कठिण आहे.

आणि वरील मूर्खपणाचें एक मूलकारण चुकीच्या सामाजिक संस्कारांत सांपडतें : मानव म्हणजे एकंदर सामाजिक संस्कारांचें फलित होय. राष्ट्रांतील सरकार अथवा समाजधुरीण यांनीं जर त्याच्या मनावर लहानपणापासून आसुरी तत्त्वज्ञान बिंबविलें, तर तो कोणत्याहि परिस्थितींत त्या तत्त्वज्ञानाप्रमाणें आचरण करण्यास किंचित्‌हि मागेंपुढें पाहणार नाहीं. नवीन परिस्थितीला योग्य उत्तर देण्याचा त्याचा लवचिकपणा नष्ट होतो. तो अंधश्रद्ध बनतो. त्याची विवेकशीलता विरून जाते. त्याचा समंजसपणा गोठून जातो. त्याची दूरदृष्टि अंध होते. घातक कल्पना उराशीं धरून जाळपोळ, लुटालूट, खून, आक्रमण, युद्ध इत्यादि मानवजातीला कलंक लावणाऱ्या कृत्यांना तो बळी पडतो. हिट्लरचा जर्मनी, मुसोलिनीचा इटली, टोजोचा जपान इत्यादि हुकुमशाही राष्ट्रें आत्यंतिक राष्ट्रवाद, वंशाची श्रेष्ठता व पार्थिव आणि जगताचें स्वामित्व मिळविण्याची महत्त्वाकांक्षा यांनीं नुसतीं वेडावून गेलीं होतीं आणि त्यासाठीं सर्व पिढीचा बळी देण्यास हे हुकुमशहा सिद्ध होते ! जेथें हेवा, मत्सर, सूड यांचेच संस्कार आबालवृद्ध जनतेवर केले जातात, जेथें विवेकाचा अंकुरच मुळापासून छाटला जातो, जेथें आक्रमक तत्त्वज्ञान पढविलें जातें, अशीं राष्ट्रें अणुशक्तीपासून अणुगोलाऐवजीं अणुरथ निर्माण करतील असें आपल्या स्वप्नांत तरी येईल का ?

युद्धाच्या संभाव्यतेचें आणखी एक महत्त्वाचें कारण म्हणजे अणुगोलानें निर्माण केलेला राष्ट्रांराष्ट्रांतील वाढता अविश्वास हें होय : अणुगोलामुळें प्रत्येक राष्ट्राच्या अस्तित्वाचें आसनच डळमळीत झालें आहे. म्हणून प्रत्येक राष्ट्र दुसऱ्याबद्दल साशंक आहे आणि यांतूनच युद्ध भडकण्याचा दाट संभव आहे. प्रत्येक राष्ट्र असा विचार करील:—'आपल्या शत्रुराष्ट्रानें आपल्यावर घाव घालण्यापूर्वीच आपण त्यावर प्रथम आक्रमण करूं आणि अणुगोलांचा नुसता वर्षाव करून तें पार नष्ट करूं; आणि हें इतक्या अचानकपणें व वेगानें कीं त्यास याचा बदला घेण्यास मुळीं संधीच मिळूं नये. अशा रीतीनें शत्रुराष्ट्राचा पूर्ण विध्वंस झाला कीं आपलें अस्तित्व सुरक्षित राहील आणि मग सर्व कुरण आपणांस मोकळें होईल.' स्वतःच्या अस्तित्वासंबंधींची अनिश्चितता व तदुत्पन्न राष्ट्रांराष्ट्रांतील अविश्वास व साशंकता यांतून युद्धाचा डोंब उसळणें अशक्य नाहीं.

अणुयुद्ध अटळ आहे व त्यांतच मानवी संस्कृतीचा अंत होणार असें भाकित अनेक तत्त्वज्ञ व शास्त्रज्ञ यांनीं केलें आहे. पुढील अणुयुद्ध सर्वसंहारक व अत्यंत तीव्र असें होईल. डॉ. लँगमूर[1] या सुप्रसिद्ध शास्त्रज्ञाचें असें मत आहे कीं यापुढें जपानवर टाकलेल्या अणुगोलापेक्षां सहस्रपटीनें विध्वंसक असे अणुगोल तयार होतील. शिवाय त्यांची उत्पादन—पद्धति अधिक सोपी करतां येईल. असें झालें म्हणजे एकादें शत्रुराष्ट्र अमेरिकेवर ३००,००० अणुगोल टाकील आणि मग "हिरोशिमा व नागासाकी यांची जी गत झाली तीच अमेरिकेंतील भूमीच्या प्रत्येक चौरस इंचाची होईल !". मानवी संस्कृतीची स्मृति कोणत्याहि स्वरूपांत राहणार नाहीं. अणुशास्त्रज्ञांनीं अशी ग्वाही दिली आहे कीं सर्व मानवजातीचा नाश होणार नाहीं; जीव राहील; पण नागरी संस्कृति नष्ट होईल. कारण संस्कृतीचें

1 Asiatic Digest : August 1946, P. 25.








केंद्र असणाऱ्या शहरांचा पूर्णपणें विध्वंस होईल : गगनचुंबी प्रासाद जमीनदोस्त होतील; ग्रंथालयांतील ग्रंथरूपांत संगृहीत केलेल्या मानवाच्या ज्ञानाची राखरांगोळी होईल; रम्य उद्यानांतून प्रचंड ज्वाला भडकतांना दिसतील; निरपराधी नागरिकांच्या प्रेतांचा सडा पडलेला आढळेल; नागरी संस्कृतीचा मागमूसहि राहणार नाहीं. आणि असें झालें म्हणजे सर्वत्र अंदाधुंदी व अराजक यांचें साम्राज्य पसरेल. सरकार अस्तित्वांत राहणार नाहीं. मानवी हक्कांना कोणी विचारणार नाहीं. शारीरिक बळ हेंच निर्णायक ठरेल. अशा विस्कळित झालेल्या राजकीय व सामाजिक जीवनाची पुनर्घटना करणें अशक्य होईल. महत्त्वाचा प्रश्न किती लोकसंख्या मृत्युमुखीं पडेल हा नसून कोणत्या गुणाचा मानव नष्ट होईल हा आहे. इंग्लंड, जर्मनी, स्वित्झरलंड नष्ट होतील; साहारा, ब्राझिल, सैबेरिया तगून राहतील ! तमोयुगाला परत नव्यानें सुरुवात होईल. हळूहळू शास्त्राची वाढ होईल आणि कोणी सांगावें, परत एकाद्या सर्वनाशक अस्त्राचें संशोधन होऊन पुनः एकदां मानवी जीवित व संस्कृति यांवर वज्राघात होईल आणि जगताची शोकभूमि—स्मशानभूमि बनेल !

बर्ट्रांड रसेल[1] प्रभृतींचें असें म्हणणें आहे कीं अमेरिकेनें अणुगोलांच्या उत्पादनाची मक्तेदारी फक्त एकट्या स्वतःकडेच ठ्यावी आणि जर दुसऱ्या कोणत्याहि राष्ट्रानें अणुगोल तयार करण्याचा नुसता प्रयत्न केला तर त्यास कडक शासन करावें. यायोगें भावी युद्ध टळेल. कारण, अशा प्रकारच्या पाशवी सामर्थ्याच्या जोरावरच रोमनें कित्येक शतकें मेडिटरेनियन भागांत शांतता टिकविली. हा मार्ग इष्ट कीं अनिष्ट या प्रश्नावर वाद घालण्याच्या आधीं हा मार्ग कितपत यशस्वी होईल हाच प्रश्न अधिक विचारार्ह आहे. अणुगोलाची शास्त्रीय पार्श्वभूमि अभ्यासितांना आपण असें पाहिलें कीं अणुगोलाच्या उत्पादनपद्धतीचें तंत्र फार काळ गुप्त राहूं शकणार नाहीं. शिवाय कांहीं राष्ट्रांनीं अमेरिकेची धमकी धाब्यावर बसवून अत्यंत गुप्तपणें अणुगोलाचें उत्पादन करण्याचें ठरविलेंच तर त्यांस पायबंद घालणें अमेरिकेला जवळजवळ अशक्य होईल. अमेरिका परराष्ट्रांतील अणुगोलांचें गुप्त उत्पादन फक्त एकाच एक मार्गानें बंद पाडूं शकेल : त्यासाठीं अमेरिकेला एकाद्या क्रूर प्राचीन सम्राटाप्रमाणें सर्व राष्ट्रें जिंकून व त्यांचें सर्व क्षेत्रांतील स्वातंत्र्य हिरावून घेऊन तेथें आपलें लष्करी राज्ययंत्र प्रस्थापित करावें लागेल. यामुळें जगतावर नवीन प्रकारच्या भयानक साम्राज्यशाहीचा उदय होईल आणि सर्व जगत् अमेरिकेचें गुलाम बनून जाईल. पण पाशवी सामर्थ्यावर आधारलेलें अमेरिकेचें हें वर्चस्व फार काळ कदापि टिकणार नाहीं. आजच्या स्वातंत्र्याच्या, राष्ट्रवादाच्या लोकशाहीच्या व समाजवादाच्या युगांत सर्वनाश पत्करूनहि सर्व राष्ट्रें अमेरिकेच्या दंडपशाहीला प्राणान्तिक विरोध करतील. कारण जींत गुलामगिरी आहे अशी शांतता काय कामाची ? दास्य शृंखलांनीं टिकवून धरलेली सुरक्षितता सुसंस्कृत मानवास सहन होणें अशक्य आहे. मानव श्वापदाप्रमाणें नुसता जगत नाहीं, त्याला मानानें जगावयाचें असतें व त्यासाठीं तो आत्मबलिदान करण्यासहि नेहमीं सिद्ध असतो.

अणुयुद्ध टळण्याचा दुसरा संभव असा : जर सर्वच राष्ट्रें अणुगोलांच्या बाबतींत तुल्यबल असतील तर कोणीहि कोणाच्या वाटेस जाणार नाहीं. कारण, त्यांत सर्वांचाच नाश होईल. बलसाम्य हेंच सुरक्षिततेचें व शांततेचें गमक होय, असें कांहीं पंडितांचें मत आहे. पण यांत फारसें तथ्य दिसत नाहीं. कारण अणुयुगांत अस्थिरता, अविश्वास व साशंकता इतक्या वाढतील कीं प्रत्येक राष्ट्र स्वतःचें अस्तित्व टिकविण्यासाठीं दुसऱ्या राष्ट्रावर सर्वांत आधीं व अचानकपणें हल्ला करून त्यास समूळ नष्ट करण्याचा प्रयत्न करील. अमेरिका व रशिया या दोन बळ्या राष्ट्रांत याच कारणामुळें केव्हां युद्ध पेटेल हें सांगतां येत नाहीं.

सारांश, युद्ध कीं शांतता या प्रश्नाचें उत्तर युद्ध असेंच विधात्याच्या वहींत लिहिलेलें असावें असें दिसतें. हा विचार खरोखर निराशाजनक व मन

1 Polemic : July—August 1946.








अस्वस्थ करणारा आहे. पण त्यास इलाज नाहीं. कारण तो सत्य ठरण्याचाच संभव फार आहे.

### स्वातंत्र्य व समता यांवर अरिष्ट

अणुगोलामुळें शांतता–देवीची मूर्ति दुभंगेल येवढेंच नव्हे, तर त्यामुळें स्वातंत्र्य व समता या तत्त्वद्वयावर गदा येण्याचा दाट संभव आहे. लोकशाहीला अणुगोलापासून धोका आहे.[1] अणुगोलांची विध्वंसक शक्ति अफाट असल्यामुळें हें अगदीं निश्चित आहे कीं ह्या शक्तीचें उत्पादन फक्त सरकारच्याच हातीं राहील. या बाबतींत व्यक्ति–स्वातंत्र्यवाद लावतां येणार नाहीं. कारण अणु–गोलांची संहारक शक्ति इतकी भयंकर आहे कीं जर एकादी व्यक्ति अथवा संस्था त्यांचें उत्पादन करूं लागली तर ती व्यक्ति अथवा संस्था सरकारास डोईजड होऊन बसेल आणि जनतेच्या सुरक्षिततेस व हितास मारक ठरेल. तेव्हां सरकारच फक्त अणुगोलांच्या बाबतींत मक्तेदार राहील. यामुळें सरकारचें लष्करी बळ अनंत पटींनीं वाढेल. आणि अर्थातच त्या प्रमाणांत व्यक्ति आणि समाज पंगु बनतील. त्यांचें नैतिक सामर्थ्य सरकारच्या प्रचंड पाशवी सामर्थ्यापुढें फिकें पडेल. म्हणून सुधारणा अथवा राज्यक्रांति यांच्या यशाचा संभव फार कमी झाला आहे. आगगाडीच्या शोधामुळें लष्कराचें केंद्रीकरण सुलभ झालें. मशीन–गन्स्, टँक्स् इत्यादि अस्त्रांच्या साहाय्यानें बहुसंहार करणें शक्य झालें. विमानांतून गोल टाकून कोणत्याहि भागाचा विध्वंस सहजसाध्य झाला. संहारशास्त्राच्या या प्रगतीमुळें सरकारचें पाशवी सामर्थ्य वाढत आहे. अणुगोलानें यांत फार मोठी भर टाकली आहे. यापुढें सरकारला कोणत्याहि भागांतील चळवळी अथवा क्रांति दडपून टाकणें म्हणजे नुसता पोरखेळ वाटेल. व्यक्ति–स्वातंत्र्याधर व जनतेच्या हक्कांवर अशा रीतीनें अणुगोलामुळें भीषण अरिष्ट ओढवलें आहे.

अणुगोलांच्या उत्पादनांत सरकार मक्तेदार राहील हें खरें; पण भांडवलशाही समाजव्यवस्थेंत अणुशक्ती–चा उपयोग आर्थिक क्षेत्रांत करून घेण्याची मुभा सरकार उद्योगपतींना देईल. यामुळें समाजांतील विषमता आणखी वाढीस लागेल. अणुशक्तीच्या उदयामुळें श्रम व काळ यांची असंख्य पटींनीं बचत करतां येणें शक्य होईल. पण यामुळें औद्योगिक क्रांतीच्या पूर्वार्धांत निर्माण झालेला बेकारीचा प्रश्न परत नव्यानें उत्पन्न होईल. अणुशक्तीच्या अफाट सामर्थ्यामुळें मजुरांची गरज कमी होईल. म्हणून बऱ्याच मजुरांना कामावरून काढलें जाईल. बेकारी फुगत जाईल. अशा रीतीनें अणुशक्तीच्या प्रचंड सामर्थ्यामुळें एकीकडे वस्तूंचा ढीग व दुसरीकडे अन्नान्नदशा अशी परिस्थिति निर्माण होईल. आर्थिक विषमता या राक्षसीचा नंगानाच समाजांत परत सुरू होईल. सारांश, अणुगोलामुळें स्वातंत्र्य व समता या पूज्य देवतांच्या अनेकदां रक्त सांडून बांधलेल्या मंदिरांना पुनः एकदां सुरुंग लागला आहे.

### विश्वराष्ट्राच्या प्रस्थापनेचें महत्त्व

मानवी संस्कृतीचे पंचप्राण—सुरक्षितता, शांतता, स्वातंत्र्य, समता व बंधुता—यांवर अणुगोलानें अपूर्व असें भयंकर अरिष्ट आणलें आहे. यांतून जगताची सुटका कशी होईल हा अत्यंत जिव्हाळ्याचा प्रश्न मानवास आतां सोडविला पाहिजे. विवेक हा एकच, फक्त एकच, पण खरोखरी राम-बाण उपाय, मानवजातीस तारण्यास आतां शिल्लक उरला आहे. संकुचित वृत्ति, विकारवशता, सूड, मत्सर, द्वेष इत्यादि दोष झटकून टाकून विवेक, विशाल वृत्ति, समंजसपणा, संयम, तडजोडवृत्ति इत्यादि गुणांचा अंगीकार मानवानें आतां केला पाहिजे; तरच सर्वनाश टळेल आणि अणुशक्तीचें संशोधन विषाऐवजीं अमृत ठरेल. मानवी विवेक हा परीस आहे. तोच फक्त अणुगोलरूपी लोहाचें सुवर्णामध्यें रूपान्तर करण्यास सर्वसमर्थ आहे.

मानवी विवेक गृहीत धरला तर जागतिक शांतता, स्वातंत्र्य व समता यांचे प्रश्न प्रत्यक्षांत कोणत्या उपायांनीं सुलभतेनें सुटतील असा प्रश्न आहे. संयुक्त–राष्ट्र–संघ अथवा विश्वराष्ट्र ही एकच संस्था अणुगोलानें निर्मिलेल्या अरिष्टावर अचूक व कायमचें यश मिळविण्याची गुरुकिल्ली होय. विश्वराष्ट्राची शक्याशक्यता व इष्टानिष्टता या प्रश्नावर विद्वानांत

---

1 Some Political Consequences of the Atom Bomb : By E. L. Woodward, P. 20.








मतभेद असतील; पण अणुयुगांत विश्वराष्ट्र हीं अत्यंत महत्त्वाची निकड आहे ही गोष्ट मात्र निर्विवाद आहे. वंश, धर्म, जात इत्यादि संकुचित निष्ठा विशाल अशा मानवतेच्या गंगेंत विलीन केल्या पाहिजेत आणि समाजसत्तेच्या भक्कम पायावर विश्वराष्ट्राचा प्रासाद उभारला पाहिजे. असें केलें तरच युद्ध टळेल, शांतता टिकेल आणि मानवाची अखंड प्रगति होईल.

जगतांत शांतता दोन साधनांनीं टिकवितां येते; एक पाशवी बळ व दुसरें नैतिक बळ. पहिलें साधन संक्रमणकाळांत फार परिणामी ठरतें; पण दुसऱ्या साधनाशिवाय शांततेस शाश्वत रूप प्राप्त होत नाहीं. विश्वराष्ट्रानें जगतांत शांतता टिकविण्यासाठीं वरील दोनहि साधनांचा योग्य समयीं व योग्य प्रमाणांत उपयोग केला पाहिजे. विश्वराष्ट्राचें लष्करी सामर्थ्य कोणत्याहि राष्ट्राच्या सामर्थ्यापेक्षां अधिक असलें पाहिजे. यासाठीं विश्वराष्ट्र अणुगोलाचे बाबतींत मक्तेदार राहील. अणुशक्तीचें नियंत्रण करण्यासंबंधींच्या वाटाघाटी सं. रा. संघामध्यें होत आहेत. 'सं. रा. अणुशक्ति–कमिशन' ही संस्था अणुशक्तीमुळें उत्पन्न झालेले आंतरराष्ट्रीय प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न करीत आहे. अणुशक्तीचें योग्य नियंत्रण करून तिचा विधायक कार्यासाठीं सर्व जगतास उपयोग करून देण्यासाठीं योजना आंखणें हा या संस्थेचा मुख्य हेतु आहे; पण या संस्थेच्या प्रयत्नांना दुर्दैवानें अपयशच येत आहे. आणि याचें महत्त्वाचें कारण रशियाचें असहकारितेचें धोरण हें होय. रशियाच्या या धोरणाचें कारण कांहींहि असो, पण रशिया अणुशक्तीच्या आंतरराष्ट्रीय नियंत्रणाखालीं कराव्या लागणाऱ्या राष्ट्रीय सार्वभौमत्वाच्या थोड्याशा त्यागाला तयार नाहीं ही मात्र वस्तुस्थिति आहे. अमेरिकेनें मात्र आपलें समंजसतेचें धोरण ६ ऑगस्ट १९४५पासूनच जाहीर केलें आहे. अमेरिकेला अणुशक्तीच्या बाबतींत आंतरराष्ट्रीयीकरण, उघडपणा, विधायक उपयोग हेंच पाहिजे आहे. आणि त्यासाठीं विश्वराष्ट्राला आपल्या सार्वभौमत्वाचें जें मर्यादित दान करावयास लागेल त्यासहि अमेरिकेची तयारी आहे. हेंच धोरण जगांतील सर्व राष्ट्रांनीं अवलंबावयास हवें. कारण, त्यायोगेंच विश्वराष्ट्र केवळ बाहुलें न राहतां प्रबळ होईल. यासाठीं विश्वराष्ट्रालाच फक्त अणुगोलांचें उत्पादन करण्याचा, त्यांचा संग्रह करण्याचा व त्यांचा वेळप्रसंगीं आक्रमक राष्ट्रांविरुद्ध उपयोग करण्याचा एकमेव अधिकार दिला पाहिजे. पाशवी बळाची वाढ करणें व त्याचें केन्द्रीकरण विश्वराष्ट्राजवळ करणें हें नैतिकदृष्ट्या पाप आहे हें खरें आहे; पण आजच्या अस्थिरतेच्या, अविश्वासाच्या व अतिमहत्त्वाकांक्षेच्या युगांत हें पाप करणें अगत्याचें व शहाणपणाचें आहे. विश्वराष्ट्रानें पाशवी बळाचा उपयोग योग्य वेळीं व प्रामाणिकपणें केला तर जगाचें अस्तित्व टिकेल व मानवजातीची प्रगति करणें शक्य होईल. पण मागें म्हटल्याप्रमाणें विश्वैक्याला चिरस्थायी रूप येण्यासाठीं त्यास नैतिक सामर्थ्याचें अधिष्ठान द्यावयास हवें. विश्वैक्याचें तत्त्वज्ञान व आंतरराष्ट्रवादी जनमत हेंच नैतिक सामर्थ्याचे प्रमुख घटक होत. अणुगोलानें निर्माण केलेला अपूर्व पेंचप्रसंग सोडविण्यासाठीं मानवाच्या मनाची तयारी करणें, त्यास विवेक शिकविणें, त्यास विश्वराष्ट्राची महती पटवून देणें, थोडक्यांत विश्वराष्ट्रवादाचें तत्त्वज्ञान निर्माण करून त्याचा झपाट्यानें प्रसार करणें हें आजच्या तत्त्ववेत्त्यांचें व विचारवंतांचें आद्य कर्तव्य आहे. मागील महायुद्धांत लोकशाहीवर संक्रांत आली होती. पण हें कांहींच नव्हे. कारण भावी अणुयुद्धांत अखिल मानवजातीचें अस्तित्वच धोक्यांत येणार आहे. जगतांतील सर्व राष्ट्रांनीं आतां एक तर अणुगोलाच्या परस्परविघातक युद्धांत कायमचें नष्ट तरी झालें पाहिजे अथवा तडजोडी वृत्तीचा अवलंब करून सुधारलें तरी पाहिजे. या विकल्पांची खरी व स्पष्ट जाणीव जर प्रत्येकास करून दिली तर मानव दुसरा विकल्पच पसंत करील. तात्पर्य असें कीं जुनाट, विकृत व संकुचित संस्कारांचा गंज साफ नाहींसा करून मानव नवविचारांनीं पुनीत केला तरच विश्वैक्याला चिरकालीन स्वरूप प्राप्त होईल.

## लोकशाही समाजवादी

### समाजरचनेची आवश्यकता

विश्वैक्याला आणखी शाश्वत रूप येण्यास जगताची व घटक राष्ट्रांची व्यवस्था शास्त्रशुद्ध तत्त्वांनुसार लावली पाहिजे. दास्य आणि विषमता








हे विश्वशांतीचे दोन महारिपू आहेत. या राक्षसांची समूळ व पुरेपूर विल्हेवाट लावली तरच मानवाला सुखी जीवन जगणें शक्य होईल. म्हणून प्रथम प्रत्येक घटकराष्ट्रांत लोकशाही–तत्त्वावर आधारलेली राजकीय घटना अंमलांत आणण्याची सक्ती संयुक्त–राष्ट्रसंघानें केली पाहिजे. कारण लोकशाही मानवतेच्या संस्कृतीची पाठशाला आहे. विवेक, समंजसपणा, तडजोडवृत्ति या विश्वैक्यासाठीं लागणाऱ्या गुणांची शिकवण मानवाला लोकशाही समाजव्यवस्थेंतच मिळते. याउलट हुकुमशाही राष्ट्रांत जनतेची स्थिति घाण्यास जुंपलेल्या बैलाप्रमाणें होते. एकाद्या व्यक्तीच्या अथवा संस्थेच्या ठिकाणीं सर्व समाजाची बुद्धि गहाण ठेवली जाते. यामुळें सबंध राष्ट्राचें भवितव्य एका हुकुमशहाच्या महत्त्वाकांक्षेवर व लहरीवर अवलंबून राहतें. म्हणून जागतिक शांततेला हुकुमशाही समाजव्यवस्थेसारखा भयंकर धोका दुसरा नाहीं. लोकशाही राष्ट्रांत नवयुगाला 'ओ' देण्याची तत्पर वृत्ति प्रत्येक व्यक्तीच्या अंगीं येते. सर्वांस आपला दूरचा स्वार्थ कळतो. थोडक्यांत म्हणजे लोकशाहींत रानटी मानवाचा सुसंस्कृत मानव तयार होतो. आणि अशाच गुणांचा मानव विश्वराष्ट्राचा खराखुरा पाईक बनूं शकेल.

प्रत्येक राष्ट्राची राज्यव्यवस्था लोकसत्ताक असली पाहिजे. पण नुसत्या लोकशाही घटनेनें काम भागणार नाहीं; आर्थिक समता हाहि एक महत्त्वाचा घटक समाजधारणेसाठीं अत्यावश्यक आहे. कारण जेथें विषमता आहे तेथें व्यक्तिस्वातंत्र्याची किंमत शून्य होते. लोकशाही घटना असूनहि पैशाच्या जोरावर धनिकवर्ग सरकारला विकत घेऊन आपल्या वर्गाच्या हितास पोषक असे कायदे करून घेतो. तेव्हां व्यक्तिस्वातंत्र्य टिकवून आत्यंतिक विषमता नष्ट करण्यासाठीं विश्वराष्ट्रानें नियंत्रित भांडवलशाहीची[1] अथवा नेमस्त समाजवादी समाजव्यवस्थेची प्रतिष्ठापना करण्यास प्रत्येक घटक राष्ट्रास भाग पाडलें पाहिजे. अशा रीतीनें लोकशाही समाजवादी समाजरचना सर्व देशांत स्थापन करून युद्धाची अत्यंत महत्त्वाचीं मूलकारणें विश्वराष्ट्रानें नष्ट केलीं पाहिजेत. तरच सर्वसंहारक अशा भावी अणुयुद्धाची भीति नष्ट होईल आणि मानवाचें जीवित सुरक्षित व सुखाचें होईल.

सारांश, एका हातांत विश्वशांति, स्वातंत्र्य व समता यांच्या तत्त्वज्ञानाची भगवद्गीता घेऊन व दुसऱ्या हातांत वेळप्रसंगासाठीं अणुगोलरूपी खड्ग ठेवून विश्वराष्ट्रानें जगतांत शाश्वत शांतता टिकविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. याच मार्गानें अणुगोलानें निर्माण केलेल्या प्रश्नचिन्हाला समर्पक उत्तर मिळणार आहे.

याउलट विवेकानें विकाराला जिंकलें तर जगताचें नंदनवन होईल.[2] अणुशक्तीचा उपयोग मानवानें जर विधायक कार्यासाठीं केला तर निसर्गदेवतेच्या सर्व शक्ती मानवाच्या सेवेस हजर राहतील. तेल व कोळसा यांपासून मिळणारी शक्ति अणुशक्तीपुढें फिकी ठरेल. हॅन्फोर्ड व रिज् येथें अणुशक्तीनें उत्पादन करण्याच्या योजना आंखल्या आहेत. तेथें दर तासाला ७१००गॅलन तेल अथवा १८ टन कोळसा जाळून निघेल इतकी उष्णता तयार होईल. आजमितीस शास्त्रज्ञांना प्लुटोनियमसारख्या जड अणूंचें विच्छेदन करूनच अणुशक्ति निर्माण करतां येते. पण यापुढें विपुल व हलक्या असलेल्या हायड्रोजन व हेलियम यांच्या अणूंचें पृथकरण करून मानवाला शें. १००० अधिक शक्ति उत्पादित करतां येणार आहे. अणुशक्तीमुळें दळणवळणाच्या साधनांत आमूलाग्र क्रांति होईल. मुंबई व न्यूयॉर्क हीं शहरें पुणें–मुंबईइतकीं जवळ येतील. त्याचप्रमाणें रेडिओ, टेलिफोन, टेलिग्राफ यांत अपूर्व सुधारणा होतील. रेडिओचें उत्पादन इतकें वाढेल कीं प्रत्येकाला आपल्या खिशांत फाउन्टनूपेनप्रमाणें रेडिओ–रिसीव्हर व ट्रॅन्समिटर बाळगतां येतील. वैद्यकशास्त्रांतहि विलक्षण प्रगति होईल असा शास्त्रज्ञांचा विश्वास आहे. सर्वांत महत्त्वाची क्रांति अन्नधान्याच्या उत्पादनांत होईल. डॉ. रॅबिनोविच यांच्यासारख्या अत्यंत बुद्धिमान् शास्त्रज्ञांच्या प्रयत्नांना

१ नियंत्रित भांडवलशाहीवर उत्कृष्ट ग्रंथ लर्नर यांचा 'इकॉनॉमिक्स ऑफ कंट्रोल' हा होय.

2 Popular Science : May 1947.








यश आलें तर अल्प श्रमांत व अल्प काळांत अमर्याद धनाचें उत्पादन होऊन उपभोग्य वस्तूंची नुसती रेलचेल होईल. समाजवादाची जरूरी भासणार नाहीं. जगतावर खरोखर स्वर्ग अवतरेल !

डॉ.लोन्सडेल[1] म्हणतात, "ज्ञानवृक्षाला विधायक ज्ञान व विघातक ज्ञान अशीं दोन फळें आलीं आहेत आणि मानवाला यांपैकीं एकाची निवड करावयाची आहे." मानवाच्या पसंतीवर जगताचें भवितव्य अवलंबून राहणार आहे. आणि जगताचें भवितव्य काय आहे ? —स्वर्ग अथवा श्मशानभूमि ?

1 Atomic Energy : World Unity Booklets, P. 13.

---

## वरिष्ठ कोण : सेनापति कीं मुलगा ?

पर्ल हार्बर जपान्यांनीं चुटकीसरसें घेऊन अमेरिकेला कधीं पाहिला नव्हता असा टोला हाणला होता. अमेरिका खडबडून जागी होऊन युद्धाची तयारी करूं लागली होती. अशा धामधुमीच्या वेळीं एकदां जनरल थिओडोर रूझव्हेल्ट विमानानें प्रवास करीत होते. त्या वेळीं विमानांत जागा मिळणें कठिण झालें होतें आणि मिळालेली जागा टिकून राहणें तर त्यापेक्षांहि मुष्किलीचें होतें. थि. रूझव्हेल्ट ज्या विमानानें प्रवास करीत होते तें विमान वाटेंत एका मुक्कामावर थांबलें. त्याच मुक्कामांत, त्या विमानांत आपणास जागा मिळावी म्हणून एक तरुण खलाशी आपल्या वरिष्ठ अधिकाऱ्याची परवानगी घेऊन त्या विमानतळावर आला होता. तो दीनपणें म्हणूं लागला—" कांहींहि करा. पण मला एक जागा द्या. मला माझ्या आईला भेटायचें आहे. मला अवधि फार थोडा आहे." तिकिट देणारी मुलगी साधारण रागावूनच त्याला म्हणाली—"अहो तुम्हांला माहीत आहे ना, हल्लीं युद्ध चालूं आहे ?" त्या दोघांमधील हें बोलणें थि. रूझव्हेल्ट ऐकत होते. ते एकदम पुढें आले व म्हणाले— " माझी जागा या खलाशाला द्या. मी मागाहून येईन." इतकें बोलून ते परत फिरले व मीहि त्यांच्यामागून निघालों. मीं त्यांना म्हटलें—" टेडी, तुम्हीं हें काय केलें ? कोणाला सांगितलें तर त्याचा विश्वासहि बसणार नाहीं. तुम्हांला देखील काय घाई नाहीं का ?" "शेरी," त्यांनीं आपल्या सुप्रसिद्ध लकबीनुसार दांत विचकून हंसून उत्तर दिलें, " अरे बाबा, हा अधिकाराचा प्रश्न आहे. मी आपला साधा सेनापति आहे. पण तो आपल्या आईचा मुलगा आहे !"

—कॅ. शेरिडन (अमेरिकन एअरलाइन्स) यांनीं सांगितलेली एक गोष्ट,
रीडर्स डायजेस्ट, मे १९४८.








# पॅलेस्टाइनच्या प्रश्नाची पार्श्वभूमि

श्री. दि. के. बेडेकर

अवघ्या अठरा लाख लोकवस्तीचा पॅलेस्टाइनचा प्रदेश आज दोन चिमुकल्या राज्यांत विभागला गेला आहे; आणि अणु–विभाजनामुळें जशी एक भीतिदायक स्फोटक शक्ति, तशीच अस्थिरता निर्माण होते, तशी भीषण आंतरराष्ट्रीय अस्थिरता या फाळणीमुळें उत्पन्न झाली आहे. सहा लाख यहुदी व बारा लाख अरब हे पॅलेस्टाइनचे रहिवाशी पण यांच्यांतल्या भांडणाच्या ठिणगीनें 'साऱ्या मध्यपूर्वेंतच भडका उडतो कीं काय ? कां तिसऱ्या महायुद्धालाच हें निमित्त आहे ?' असें भय सगळ्यांनाच वाटूं लागलें आहे.

हें भय उगीच, अनाठायीं नाहीं. खरोखरच या टीचभर प्रदेशांत येवढें स्फोटक द्रव्य ठासून भरलेलें आहे कीं त्यांतून महान् अनर्थ उद्भवण्याची शक्यता आहेच.

ता. ११ जून रोजीं, यूनोतर्फे एक युद्धतहकुबी ठरली आणि यहुदी व अरब यांनीहि ती मानली. पण अवघ्या चोवीस तासांतच तहकुबीला धाब्यावर बसविण्याचे प्रकार दोन्ही पक्षांकडून घडले. ता. १५ मे रोजीं, ब्रिटिशांनीं आपलें 'मॅन्डेट' रद्द केलें व यादवीला तोच शकून ठरला ! तेव्हांपासून हा घनघोर लढा व रक्तपात चालूच आहेत. त्यांत यूनोतर्फे तहकुबीचा जो प्रयत्न झाला त्याची अशी वासलात लागत आहे असें दिसतें.

पंचावन्न राष्ट्रांचा संघ म्हणजे यूनो ! त्याच्या निर्णयाला धाब्यावर बसविण्याचें साहस सहा लाखांच्या नवजात यहुदी राज्यानें व बारा लाखांच्या अरब राज्यानें करावें, म्हणजे केवढें आश्चर्य ! पण, यांत वस्तुतः आश्चर्यकारक असें कांहीं नाहीं. कां नाहीं ? या प्रश्नाचें उत्तर मिळविण्यासाठीं आपणांला जरा तपशिलांत व खोलांत शिरलें पाहिजे.

## पॅलेस्टाइनमध्यें तीन शक्तींचा संघर्ष

पॅलेस्टाइनच्या प्रश्नाचें खरें स्वरूप समजण्यासाठीं तेथल्या राजकारणांत अवतरलेल्या तीन महान् शक्तींची ओळख करून घेतली पाहिजे. या तीन शक्तींचा संघर्ष ज्या 'पानिपतावर' होत आहे, तो प्रदेश म्हणजे पॅलेस्टाइन. तसें भौगोलिक दृष्टीनीं पाहतां पॅलेस्टाइम हें आफ्रिका, आशिया व युरोप या त्रिखंडांच्या संगमावर आहे. खुष्कीला महत्त्व होतें त्या प्राचीन काळांत पॅलेस्टाइनला महत्त्व आलें तें यामुळेंच आणि यहुदी व अरब या जमातींना व्यापारी व बौद्धिक क्षेत्रांत जें मानाचें स्थान प्राचीन काळांत मिळालें, तेंहि या भौगोलिक स्थानामुळेंच.

पण आजच्या संघर्षांत ज्या तीन शक्तींची टक्कर या प्राचीन पवित्र भूमीवर होत आहे त्या अगदीं आधुनिक शक्ती आहेत. या तीन शक्ती अशाः—

१ अरब लोकसमूहाचा नवजात राष्ट्रवाद; तसाच, यहुदी जमातीचा आधुनिक साम्राज्यवादाच्या रगाड्यांत जो अमानुष छळ झाला त्यांतून वांचण्याची यहुदी जमातीची राष्ट्रवादी आकांक्षा.

२ ब्रिटनची मध्यपूर्वेंतील प्रदेशावर व आशियावर असलेली साम्राज्यवादी पकड, तशीच बलिष्ठ व वर्धिष्णु अशा अमेरिकन साम्राज्यवादाची या खनिज तेलाच्या प्रदेशावर आक्रमण करण्याची धडपड.








३ स्वसंरक्षणाच्या व लोकशाहीच्या सुरक्षिततेच्या दृष्टीनें तिसरें महायुद्ध टाळण्याची सोव्हिएट यूनियनची धडपड. ब्रिटन व अमेरिका यांच्या परस्पर-संघर्षांतून किंवा सोव्हिएट-विरोधी युतींतून महा-युद्धाचा वणवा भडकवण्याचा धोका टाळण्यासाठीं आणि अरब व यहुदी आकांक्षांना सहकार्यानें पूर्तता आणण्यासाठीं सोव्हिएट यूनियनचे प्रयत्न.

## बड्या राष्ट्रांच्या संघर्षाची पार्श्वभूमि

वरील तीन घटकांपैकीं ब्रिटन, अमेरिका व सोव्हिएट यूनियन यांच्यावरच आज जागतिक राजकारणाची सर्व मदार आहे. हिट्लर–मुसोलिनी–टोजो यांचा फॅसिस्ट गट व ब्रिटन–अमेरिकांचा साम्राज्य–वादीच परंतु 'लोकसत्ताक' आवरणाचा गट यांच्यांतल्या संघर्षानें दुसऱ्या महायुद्धापूर्वीचें राजकारण रंगत गेलें होतें त्या वेळींहि सोव्हिएटची तिसरी शक्ति होतीच आणि तिच्याविरुद्ध या साऱ्याच साम्राज्यवाद्यांची एकजूट करण्याची मनीषा हिट्लरच्या मनांत होती तशी चेंबरलेनच्याही मनांत होती; पण शेवटीं व्हावयाचें तेंच झालें ! आपसांतच साम्राज्य-वाद्यांची जुंपली व त्यांत मागाहून सोव्हिएट खेंचलें गेलें. तोच प्रकार आज घडूं पाहत आहे; अर्थात् आज बलाबलामध्यें फार फेरफार झाले आहेत पण त्याचा विचार मग करूं. तूर्त येवढेंच लक्षांत घ्यावयाचें कीं ब्रिटन व अमेरिका यांचा संघर्ष व सोव्हिएटच्या विरोधी अशी एकजूट बनविण्याची त्यांची मनीषा व तदर्थ त्यांचा प्रयत्न यांची पार्श्वभूमि सर्वच प्रश्नांना आहे, तशीच पॅलेस्टाइनच्या प्रश्नालाहि आहे.

वरील पार्श्वभूमीचें अवधान मनांत बाळगून आपण खुद्द पॅलेस्टाइनमधील यहुदी व अरब यांच्या बलाबलाकडे वळूं.

## अरबांचा राष्ट्रवाद व अरब–लीग

प्रथम अरबांचा प्रश्न घेतला तर असें दिसतें कीं पॅलेस्टाइनमध्यें (सन १९४६ मध्यें) १२,०३,००० अरब आहेत. पण, पॅलेस्टाइनमधल्या या बारा लाख अरबांचा प्रश्न वेगळा असा काढतांच येत नाहीं. त्यांच्याबरोबरच सीरिया, ट्रॅन्सजॉर्डेनिया, सौदी अरेबिया, येमेन, इराक व ईजिप्त या सहा अरब राष्ट्रांचा विचार करावा लागतो. शिवाय आफ्रिकेच्या किनाऱ्यावर पसरलेले अरब आहेतच. तूर्त त्यांना वगळलें व वरील सात राष्ट्रांची अरब लोकवस्ती घेतली तर ती १,८८,००,००० आहे व त्यांचें एकंदर क्षेत्रफळ १६,८७,४०० चौरस मैल आहे.

अरबांच्या या सात राष्ट्रांमधील १,८८ लक्ष जनतेच्या राष्ट्रीय आकांक्षेला व शक्तीला डावलून पॅलेस्टाइनबद्दल कोणतीहि योजना अंमलांत आणणें शक्य नाहीं, ही गोष्ट पूर्वींहि स्पष्ट होती व चालू युद्धांत तर ती अगदीं उघड झाली आहे.

या अरब जनतेचें स्पष्ट मत असें आहे कीं पॅलेस्टाइन ही अरब भूमि असून तेथें यहुदी हे परके आहेत. आणि इतिहासहि तसाच आहे. सन १९२२मध्येंच पाहावें तर पॅलेस्टाइनमध्यें अवघे ८३,७९० यहुदी होते. त्यांत बाहेरील यहुदी पाहुण्यांची भरमसाट भर पडून चोवीस वर्षांत सहा लाखांपर्यंत ही कृत्रिम वाढ झालेली आहे. ही वाढहि यदृच्छेनें उगीच झालेली नाहीं. तर मोठ्या पद्धतशीरपणें ब्रिटिशांनीं या बाहेरच्या यहुद्यांना पॅलेस्टाइनमध्यें वसवून तेथें अरबांच्या छातीवर ही एक अल्पसंख्याक जमात बसविलेली आहे. या यहुदी नवागतांपैकीं कित्येकजण नाझींच्या अमानुष छळांतून वांचलेले शरणार्थी आहेत, हें खरें. परंतु त्यांचा उपयोग मात्र अरब जनतेला राजकीय जोखडांत कायमचें ठेवण्यासाठीं करण्याचा ब्रिटिशांचा डाव होता हें उघड आहे.

ब्रिटिशांच्या हातींच मॅन्डेटच्या रूपानें पॅलेस्टाइनचा कारभार सन १९२२पासून होता व त्यांनींच यहुदी अल्पसंख्याकांची धोंड अरबांच्या गळ्यांत बांधली. अर्थात् अरब जनतेचा राष्ट्रवाद हा प्रखरपणें ब्रिटन–विरोधी असणें स्वाभाविक आहे व तसा तो आहेहि. पण जनतेच्या या ब्रिटन–विरोधी राष्ट्रवादाचें पुढारीपण ज्या अरब–लीगच्या हातीं आज आहे ती लीग मात्र जन्मानें व कर्मानें कट्टर ब्रिटन–विरोधी नाहीं. उलट

तिची भूमिका अत्यंत संधिसाधूपणाची, धरसोडीची व नागमोडी वळणाची आहे. कारण, तिचा जन्मच ब्रिटनच्या पाताळयंत्री मुत्सद्देगिरीच्या भट्टींतून झालेला आहे.

अरबस्तानांत गोऱ्यांचा प्रवेश होण्यापूर्वी तेथील धार्मिक व राजकीय पुढाऱ्यांच्या हातीं मध्ययुगीन काळाला अनुरूप अशी एकतंत्री सत्ता होती. त्याच पुढाऱ्यांना हाताशीं धरून ब्रिटननें अरबांच्या राष्ट्रवादाला दाबांत ठेवण्याचें धूर्ततेचें धोरण स्वीकारलें. हेंच धोरण त्यांनीं हिंदुस्थानांत व इतर देशांत स्वीकारलेलें आपण पाहतोंच. जुने राजे, नबाब, जमीनदार व मौलवी आणि नवे हांवरे भांडवलदार व सुशिक्षित लोक हाताशीं धरूनच जनतेच्या राष्ट्रवादाला काबूंत ठेवण्याचा डाव साम्राज्यवाद्यांनीं सगळ्या परतंत्र देशांत यशस्वी केलेला आहे. तोच प्रकार अरब-लीगच्या बाबतींतहि आहे.

या लीगचे पुढारी जुने आहेत; पण या संघटनेचा जन्म तसा अलीकडचा, म्हणजे ता. २२ मार्च १९४५ रोजीं झालेला आहे. जन्मानंतर या लीगच्या पुढाऱ्यांनीं एकीकडे अरब जनतेला राष्ट्रवादी जहाल भाषा शिकविण्याचें धोरण ठेवलें व दुसरीकडे ब्रिटनच्या सोन्याच्या बेड्या स्वतःच्या पायांत व जनतेच्या पायांत अडकवून घेतल्या. उदाहरणार्थ, सन १९४६मधला ब्रिटन व ट्रॅन्सजॉर्डन यांच्यांतला तह घ्या. दोन स्वतंत्र सार्वभौम राष्ट्रांतला हा परस्पर-मैत्रीचा करारनामा! पण त्यांतील कलमें पाहावीं तर ट्रॅन्सजॉर्डनला ब्रिटिश सैन्याची बराकच बनविण्याची सवलत ब्रिटनला देऊं केलेली! आणि हें सारें केवळ मैत्रीखातरच! दोन राष्ट्रांतील तहाचें नागडें विडंबन कां झालें? तर ट्रॅन्सजॉर्डन या 'स्वतंत्र' राष्ट्राचा राजा अबदुल्ला हा ब्रिटनकडून, म्हणजे एका ब्रिटिश तेल-कंपनीकडून कांहीं कर घेतो. या कराची रक्कम दर वर्षी ३,००,००,००० रुपये आहे!

इराकवरहि असाच एक शहाजोग तह पूर्वी लादण्यांत आला होता व त्याची ता. २४ जानेवारी १९४८ रोजीं उजळणी करण्यांत आली. त्या उजळणीच्या वेळीं इराकच्या जनतेंत प्रक्षोभ झाला व ठिकठिकाणीं निदर्शनें झालीं; पण तीं दडपून टाकून शांतता व सुव्यवस्था लवकरच स्थापन करण्यांत आली.

या सर्व लाजिरवाण्या ब्रिटिशधार्जिण्या तहनाम्यावर सह्या करणारे लोक म्हणजेच आजचे अरब-लीगचे पुढारी होत. आज पॅलेस्टाइनमध्यें लढणाऱ्या अरब फौजांचेहि पुढारी यांतलेच आहेत. त्यांचे हात आज यहुदी रक्तानें बरबटत असले तरी कालपर्यंत त्यांनीं खुद्द अरब जनतेवरहि प्रहार केलेला आहे व त्यांचे हात जर खरे कशानें बरबटलेले असतील तर ब्रिटिश तेल-कंपन्यांनीं दिलेल्या मलिद्यानें!

मध्यपूर्वेंतलि ब्रिटिश राजनीतीचें वर्णन असें करतात कीं ब्रिटिशांचा एक हात तेलांत बुडलेला व दुसरा रक्तांत बुडलेला आहे. तेंच वर्णन ब्रिटिशांच्या पापाचे भागीदार होणाऱ्या या अरब-लीगच्या पुढाऱ्यांना लागू पडतें.

जगांतील सर्व मुसलमानी बांधवांना वेळोवेळीं साद घालण्यास हे अरब-लीगचे पुढारी कमी करीत नाहींत व तिला साथ देण्यास जीनासाहेबांसारखे समानशील पुढारी उभे राहतात, यांत मग नवल कसलें? दोन कोटी अरब जनतेचा राष्ट्रवाद मात्र या बरबटलेल्या तेलकट व संधिसाधू स्वार्थाला विरोधी आहे. अरब जनतेच्या या ब्रिटनविरोधी राष्ट्रवादाकडे पाहूनच आपण असें निःशंकपणें म्हणूं शकूं कीं पॅलेस्टाइनमध्यें व एकंदरच मध्यपूर्वेंत अरबांना पाठिंबा देणें हें जगांतल्या सर्व लोकसत्तावाद्यांचें कर्तव्य आहे व अरबांचाच पक्ष न्यायाचा आहे.

## यहुद्यांचें दुःख व भांडवल

आतांपर्यंत अरब जनतेच्या न्याय्य भूमिकेचें व लीग-पुढाऱ्यांच्या संधिसाधू व ब्रिटनधार्जिण्या वृत्तीचें वर्णन केलें. त्यांत यहुद्यांच्या बाजूला मुळींच न्याय नाहीं अशी भूमिका सूचित केली गेली खरी; परंतु वस्तुतः यहुद्यांच्या बाजूनेंहि असें म्हणावें लागतें कीं त्यांना जरी ब्रिटिशांनीं आपल्या स्वार्थासाठीं आणलें असलें तरी आज ते पॅलेस्टाइनचे नागरिकच आहेत. या सहा लक्ष लोकांनीं पॅलेस्टाइनमध्येंच जगावयाचें आहे व तेंहि अरबांशीं सहकार्य करूनच जगावयाचें आहे.

पॅलेस्टाइनच्या १२,००,००० अरबांचा प्रश्न हा जसा १,८८,००,००० अरब जनतेचा प्रश्न







आहे असें आज दिसून येतें, त्याचप्रमाणें तेथील ६,००,००० यहुद्यांचा प्रश्नहि एकंदर जगांतील सुमारें एक कोट यहुद्यांच्या भवितव्याशीं निगडित आहे. याला आपल्या अनुभवांतील दाखला द्यावयाचा तर हिंद व पाकिस्तान यांमधील हिंदू व मुसलमान निर्वासितांचा देतां येईल. हिंदमधील जनतेला हिंदुस्थानांत आलेल्या निर्वासितांचा समावेश आपल्यांत करून घेणें आवश्यकच आहे. त्याप्रमाणें बाहेरील जगांत अमानुष छळाला बळी पडणाऱ्या यहुद्यांपैकीं जे कोणी जीव बचावून पॅलेस्टाइनमध्यें आले आहेत किंवा आणले गेले आहेत, त्यांना या भूमीवर जगविणें हें देखील न्याय्यच ठरतें. 'इतर कोठें न वसावितां पॅलेस्टाइनमध्येंच त्यांना कां वसवावें ?' हा प्रश्न उद्भवतो. त्याला उत्तर असें कीं इतिहास पाहतां खरोखरच पॅलेस्टाइन ही यहुदी व अरब या दोघांच्याहि पूर्वजांची मातृभूमि व धर्मभूमि आहे. वंशशास्त्रदृष्ट्या यहुदी व अरब हे एकच आहेत व म्हणून यहुद्यांची इच्छा आपल्या परंपरागत भूमीवर वसण्याची आहे यांत वावगें किंवा अन्याय्य असें कांहीं नाहीं.

युरोपमध्यें नाझी राजवट येण्याच्या आधीं सुमारें एक कोटि यहुदी होते. त्यांपैकीं सुमारें साठ लक्ष हिटलरी हत्याकांडांत जिवानिशीं मारले गेले व उरलेल्यांपैकीं चार लक्ष घरादाराला मुकलेले निर्वासित आहेत. या दुर्दैवी लोकांना जर पॅलेस्टाइनमध्यें थारा मिळाला तर ते तेथें सुखानें, श्रम करून व अरबांशीं सहकार्यानें नांदतील. अशाच तऱ्हेनें आज सोव्हिएट यूनियनमधील २६,६५,००० यहुदीहि मोठ्या मानानें आपलें स्वायत्त जीवन जगत आहेत. युरोपखेरीज अमेरिकेंत सुमारें पन्नास लक्ष यहुदी आहेत. व त्यांचाहि पाठिंबा पॅलेस्टाइनच्या या यहुद्यांना आहेच.

सारांश, जगांतील यहुदी जनतेची आकांक्षा व तिनें आज शतकानुशतकें अस्पृश्यांप्रमाणें भोगलेला छळ यांचा विचार करून पॅलेस्टाइनमध्यें यहुद्यांची वस्ती असावी हाच निर्वाळा द्यावा लागतो; पण हा प्रकार इतका सोज्वळ नाहीं. या प्रश्नाच्या निव्वळ न्याय्य बाजूकडे भोळसट भूतदयावादी दृष्टीनें पाहत राहिलें तर त्याची दुसरी काळी बाजू आपणांला दिसणार नाहीं. अरबांचा राष्ट्रवाद न्याय्य व सोज्ज्वळ तर खराच, पण अरबलीगचें राजकारण जसें स्वार्थांत लडबडलेलें व ओंगळच आहे, तोच प्रकार यहुद्यांच्या बाबतींत दुसऱ्या तऱ्हेनें आहे. यहुद्यांच्या छळाबद्दल जगाला वाटणाऱ्या सहानुभूतीचा फायदा घेऊन यहुद्यांच्या मार्फत आपलें उलट्या काळजाचें साम्राज्यवादी कारस्थान पॅलेस्टाइनवर लादण्याचा प्रयत्न ब्रिटननें केला, हें तर मागें सांगितलेंच. आतां ब्रिटनच्या जोडीला अमेरिका आली आहे. डॉलरचें प्रचंड भांडवल आज पॅलेस्टाइनच्या यहुद्यांच्या मागें उभें आहे. त्यांचे पुढारीहि अरब लीगच्या पुढाऱ्यांप्रमाणें या भांडवलाचे दास बनले आहेत. आजपर्यंत अमेरिकेचा हात स्पष्ट न दिसण्याइतका संभाळून होता; पण गेल्या एकदोन वर्षांत अमेरिकन हस्तक्षेपाचा उघडपणा वाढत गेला आहे. यहुद्यांच्या 'इर्गून', 'हगाना' प्रभृति रक्षाकारी संघटना अमेरिकन मदतीनें व शस्त्रांनीं लढत आहेत.

याचा अर्थ असा कीं यहुदी जनतेचे पुढारी आज पॅलेस्टाइनमध्यें नुसती नांदावयाची इच्छाच ठेवीत नसून अमेरिकन भांडवलदारांचे हस्तक बनून हिंस्र पद्धतीनें लढत आहेत. त्यांच्या या लढ्याला एकीकडे न्याय्य संरक्षक लढ्याचें रूप असलें तरी दुसरीकडे भीषण असें आक्रमक रूप आहे. पॅलेस्टाइनमध्यें पाय रोवून तेथून आपलें डॉलरचें जाळें पूर्वेकडे पसरीत सारें अरब-खंड त्यांत गिळण्याच्या अमेरिकन कारस्थानांतलीं प्यादीं व मोहरीं म्हणून या यहुदी पुढाऱ्यांच्या व त्यांच्या रक्षाकारी अनुयायांच्या हालचाली चालू आहेत.

## तेलासाठीं व लष्करी ठाण्यांसाठीं !

पॅलेस्टाइनमधील व बाहेरील यहुदी व अरब जनतेची आणि तिच्या राष्ट्रवादाची तसेंच संधिसाधू स्वार्थी पुढाऱ्यांची ओळख करून घेतां घेतां आपण परत ब्रिटन व अमेरिका या बड्या साम्राज्यवाद्यांच्या कारस्थानांपर्यंत येऊन पोहोंचलों; आणि मागेंच म्हटल्याप्रमाणें या कारस्थानाच्या पार्श्वभूमीवरच हा भीषण रक्तपात घडत आहे. या ठिकाणीं या कारस्थानाचें व्यक्त व व्यवहारी स्वरूप थोडक्यांत स्पष्ट केलें पाहिजे. पॅलेस्टाइनमध्यें व एकंदर अरबखंडांतच साम्राज्यवाद्यांचें कारस्थान दोन गोष्टीं-










साठीं आहे : (१) खनिज तेल व (२) आशिया खंडांतील परतंत्र जनतेवर जरब ठेवण्यासाठीं व व्यापारी मार्ग खुला ठेवण्यासाठीं लष्करी ठाणीं. यांपैकीं तेलाचा प्रश्न प्रथम घेऊं. जगांतील एकंदर तेलाचें उत्पादन २८५० लक्ष टन आहे व त्यांपैकीं २२५० टन दक्षिण अमेरिकेंत व उत्तर अमेरिकेंत मिळून निघतें. सोव्हिएटमध्यें अवघें ३३० टन निघतें व बाकी सुमारें १६० टन अरबखंडांत निघतें. सर्व आशियांत मिळून २६० टन निघतें. सारांश, येवढासा हा सांठा अमेरिकेला मिळाला किंवा न मिळाला तरी काय? परंतु मक्तेदारी व साम्राज्यवादी राजकारण यांत असा हिशेब चालत नाहीं. या १६० टनांसाठींच रक्ताचे, व तेहि बिचाऱ्या अरब व यहुदी जनतेच्या रक्ताचे पाट वाहविण्याची गरज अमेरिकेला भासत आहे! या तेलाच्या मक्तेदारी हक्कांसाठींच पाण्यासारखा पैसा अरब-पुढाऱ्यांच्या पदरीं ओतण्याचा सपाटा अमेरिकेनें चालविला आहे. त्या पुढाऱ्यांना काय? ब्रिटनपेक्षां हें कुळ जास्त बडें आहे असें दिसतांच त्यांचीं पावलें इकडे वळलीं आहेत. आज यहुद्यांच्या मागें उभी असणारी अमेरिका सौदी अरेबियाच्या अरब राजाच्या मागेंहि उभी आहे व ईजिप्तमध्येंहि आपले अरब हस्तक तयार करीत आहे. ब्रिटननें 'आत्मसात्' केलेली अरब-लीग अशा रीतीनें आतां या दुसऱ्या सावकाराच्या खजिन्याकडे पाहावयास शिकली आहे. आज तेल-मक्त्यांच्या हिशेबी आंकड्यांनीं मोजलें तर अमेरिकनांचा वांटा ब्रिटनइतकाच झाला आहे व हळूहळू ब्रिटनचा वांटा बळकावीत जाण्याचा हा अमेरिकन क्रम चालू राहणारच, हें स्पष्ट दिसत आहे.

तेलासाठीं चाललेल्या या झोंबाझोंबीइतकेंच महत्त्व लष्करी ठाण्यांना आहे. पॅलेस्टाइनचें भौगोलिक स्थान या दृष्टीनें दुहेरी महत्त्वाचें आहे. एक तर अरबखंडांतील तेल वाहून नेणारे नळ समुद्र-किनाऱ्याला यावयाचे म्हणजे पॅलेस्टाइमध्येंच यावे लागतात; दुसरें म्हणजे आशियाकडे जाणाऱ्या दर्यावर्दी व खुष्कीच्या मार्गावर जरब ठेवण्यास पॅलेस्टाइनचा तळच मोक्याचा आहे. आजपर्यंत ह्या मोक्याच्या जागेवर ब्रिटनचीच निर्वेध सत्ता होती; पण आतां अमेरिकाहि भागीदारीसाठीं आली आहे. हिंदुस्थानसारख्या बाजार-पेठा ब्रिटनच्या हातून काढून घ्यावयाच्या व तेथें अमेरिकन मालाचा पूर ओतावयाचा, हें अमेरिकन भांडवलदारीचें आजचें तावडतोबीचें ध्येय आहे व त्याला अनुसरून अरब-खंडांत व पॅलेस्टाइनमध्यें अमेरिका पवित्रे टाकीत आहे. तेल-कंपन्यांची व्यापारी चढाओढ हा मार्ग पुढेंमागें अपुरा पडेल व ब्रिटनशीं शस्त्रानेंच टक्कर द्यावी लागेल याची जाणीव ठेवून अमेरिकेची ही तयारी चालली आहे.

### सोव्हिएटच्या सरहद्दीवर

अरबखंडांत पसरूं पाहणारा पॅलेस्टाइनचा हा लढा म्हणजे अरब जनता व पुढारी आणि यहुदी जनता व पुढारी या विसंवादी बाबींचा चौफेर संघर्ष आहे; यांत खरे 'लढविते' धनी ब्रिटन व अमेरिका आहेत आणि अरब व यहुदी जनतेच्या राष्ट्रवादाला साऱ्या जगांतील लोकसत्तावाद्यांचा पाठिंबा आहे. या साऱ्या गोष्टी येथवर आपण पाहिल्या. शेवटीं, आपण हेंहि पाहिलें कीं अरब व यहुदी यांच्यामागें उभे राहून व त्यांचें रक्त सांडून आपला स्वार्थ साधणारे ब्रिटनचे व अमेरिकेचे साम्राज्यवादी आपसांतहि अगदीं निकरावर येत आहेत.

इतक्या साऱ्या गुंतागुंतीमुळें पॅलेस्टाइनमध्यें गंभीर व जागतिक शांततेला धोक्याची परिस्थिति निर्माण झाली आहे.

मग, अशी ही गंभीर परिस्थिति टिकून राहील कीं वाईटच होत जाईल?

या प्रश्नाचें उत्तर देतांना प्रथमच निर्देशिलेल्या तिसऱ्या शक्तीकडे पाहावें लागतें. अमेरिका व ब्रिटन यांचा संघर्ष एकट्या पॅलेस्टाइनमध्येंच नाहीं, तर खुद्द युरोपांतहि चालू आहे व पांची खंडांवर तेंच घडत आहे. पण इतर ठिकाणीं एक तर ब्रिटन अगदीं कमकुवत पडून नामशेष होत आहे किंवा अमेरिकेलाच अजून पुरता जोर बांधतां आलेला नाहीं. जपान व हिंदुस्थान हीं अशीं दोन उदाहरणें आहेत. पॅलेस्टाइनमध्यें मात्र दोघांचें बळ एकसारखें आहे व म्हणून संघर्षाचा संभव जास्त आहे. नेमकी हीच जागा सोव्हिएट यूनियनच्या सरहद्दीवर नसती तर












आतांपर्यंत हा संघर्ष उघड महायुद्धांतच परिणत झाला असता; पण ब्रिटन व अमेरिका यांना आपलें भांडण कडेलोटापर्यंत जाण्याची धास्ती वाटत आहे याचें कारण जवळच सोव्हिएटची शक्ति उभी आहे.

## मॅन्डेट रद्द करा, सलोखा करा.

सोव्हिएट–यूनियनचें पॅलेस्टाइनविषयीं धोरण स्पष्ट आहे. त्याचें मुख्य ध्येय पॅलेस्टाइनवरील ब्रिटिश मॅन्डेट रद्द करणें व कोणाचेंहि नवें मॅन्डेट किंवा कोणाचीहि नवी ट्रस्टीशिप न लादणें हें आहे; तसेंच यहुदी व अरब यांच्या सलोख्याला उपयुक्त पडेल अशी राज्यविषयक योजना कोणती असावी याचा सोव्हिएटनें प्रथमपासून विचार केलेला दिसत आहे.

ब्रिटन व अमेरिका यांना पॅलेस्टाइनचें पालकत्व या ना त्या रूपानें हवें आहे; तेव्हां दोघेहि एकजुटीनें सोव्हिएटला प्रथमपासून विरोध करीत आहेत. पण तें पालकत्व कोणाकडे असावें या बाबतींत त्या दोघांची जुंपल्यामुळें ती एकजूट पुनः पुनः फुटत आहे.

राज्यासंबंधीं प्रथम सोव्हिएटचें मत असें होतें कीं पॅलेस्टाइनचें एक संयुक्त राज्य असावें व त्यांत यहुदी व अरब यांचीं स्वायत्त राष्ट्रें असावीं. या संयुक्त राज्याच्या (फेडरेशनच्या) कल्पनेचे पुढें अनेक पर्याय झाले. एक मॉरिसन–योजना म्हणून पुढें आली, तींत यहुदी व अरब विभागांना फक्त प्रांतिक स्वायत्तता मिळणार होती. दुसरी योजना हिंद, इराण व युगोस्लाव्हिया यांनीं पुढें केली व तिच्यांत नुसती प्रांतिक स्वायत्तता नसून यहुद्यांना व अरबांना स्वतंत्रता दिली होती. त्यांच्या स्वतंत्र राज्यांचें संयुक्त राज्य बनविण्याची ही योजना पॅलेस्टाइन–कमिशनच्या इतर आठ राष्ट्रांना मान्य झाली नाहीं व त्यांनीं फाळणीचा निर्णय घेतला. या पर्यायांपैकीं शेवटचे दोन पर्याय पाहिले तर त्यांच्यांतलें अंतर फार थोडें आहे असें दिसेल. फाळणीच्या योजनेंतहि फाळणीनंतरच्या अरब–यहुदी–सहकार्याची एक स्पष्ट योजना अंतर्भूत होती. यहुद्यांना स्वतंत्र घटक मानल्यावर संयुक्त राज्य बनणें त्यांच्या खुषीवरच राहतें व त्या बाबतींत त्यांची नाखुषी स्पष्ट दिसत असतांना फेडरेशनच्या विशिष्ट प्रकारालाच प्राधान्य देणें घातुक ठरलें असतें. खरें महत्त्व अरब–यहुदी–सलोख्याला होतें व तो फेडरेशनच्या चौकटींत साधण्याऐवजीं बिघडेल असें पाहूनच हिंद, इराण प्रभृति राष्ट्रांची सूचना कमिशननें बहुमतानें बाजूला ठेवली व फाळणीचा निर्णय घेतला.

सोव्हिएटनें हा निर्णय उचलून धरून त्याची अंमलबजावणी व्हावी म्हणून यूनोतर्फे धडपड चालविली. सोव्हिएटला मुस्लिम–लीगच्या व अरब–लीगच्या धर्मवेड्या राजकारणाचें पक्षपाती ठरविण्याचा प्रयत्न करणाऱ्या निरीक्षकांना सोव्हिएटच्या या धडपडीचा अर्थच कळेना. त्यांना आपल्या मगदुराप्रमाणें वाटलें कीं ही एक कोलांटी उडी आहे! एका निरीक्षकाची तर असें मानण्यापर्यंत मजल गेली कीं ब्रिटिश व अमेरिकन कम्युनिस्ट पक्षांत खूपच यहुदी आहेत व त्यांना खुष ठेवण्यासाठीं सोव्हिएटनें हा 'अरबांचा विश्वासघात' केला! पण, सोव्हिएटनें मागें कधीं मुस्लिम धर्मवेडया (म्हणजेच ब्रिटन–धार्जिण्या) राजकारणाचा पाठपुरावा केला नव्हता व आजहि कोणाचा विश्वासघात केलेला नाहीं. आज इस्रायल राज्याला स्पष्ट मान्यता देऊन व अरबांनाहि पाठिंबा देऊन यूनोच्या ठरावाची अंमलबजावणी व्हावी असा सोव्हिएटचा प्रयत्न आहे. फाळणीच्या निर्णयाप्रमाणें तावडतोब मॅन्डेट राखणाऱ्या ब्रिटनला यूनोतर्फे समज दिली असती तर ब्रिटननें रचून आणलेला हा आजचा अरब–चढाईचा प्रकारहि घडला नसता व त्या चढाईचें निमित्त पुढें करून यहुद्यांच्या मार्फत हात शिरकविण्यास अमेरिकेलाहि संधि मिळाली नसती. पण झालें काय? यूनोचा निर्णय धाब्यावर बसवून ब्रिटननें अरबांना उठविलें. आज ब्रिटन व अमेरिका यांचेच डावपेंच तेथें एकमेकांवर चालू आहेत; पण रक्त मात्र यहुदी व अरब यांचें वाहत आहे! यांतून निष्पन्न काय होणार? यूनोची बेअब्रू तर निष्पन्न झालीच, पण त्याचें साम्राज्यवाद्यांना काय? ते म्हणणार यहुदी व अरब भांडले म्हणून असें झालें!








# पॅलेस्टाइनच्या प्रश्नाची पार्श्वभूमि

आणि गंमत अशी कीं या 'भांडखोर जमातीं'चें पालकत्व पुनः अमेरिका व ब्रिटन यांच्याकडेच जाण्याचा धोका व संभव या यादवीमुळें निर्माण झाले आहेत. ब्रिटन व अमेरिका यांचा आपसांत कांहीं तरी करार होऊन या प्रकरणांत स्थिरस्थावर होईल, हें खासच. पण त्यामुळें पॅलेस्टाइनचें दुर्दैव संपेल का? यूनोची इभ्रत वाढेल का? अशा ठिणग्यांनीं अचानक भडकणारें तिसरें महायुद्ध टळण्यास मदत होईल का? मुळींच नाहीं.

पॅलेस्टाइनच्या प्रकरणाचा म्हणजे यादवीचा अंत करण्याची ताकद ब्रिटन व अमेरिका यांच्या अंगांत नाहीं. हा ताकदीचा प्रश्न नसून त्यांच्या राजकारणाचा प्रश्न आहे. तें राजकारणच असें आहे कीं नसेल तेथें यादवी उत्पन्न करण्याची कलागती जादू त्याच्यांत आहे. यालाच साम्राज्यवादाची 'फोडा व झोडा'ची राजनीति असें जुनें नांव आहे. ग्रीसपासून चीनपर्यंत या राजनीतीचें थैमान चालूंच आहे.

## आशेचा किरण

यांतून आशेचा किरण कोठें दिसतो? तर तो अरब व यहुदी सामान्य जनतेच्या राष्ट्रवादांत आहे. हा राष्ट्रवाद आज तेथील राबणाऱ्या व सुशिक्षित जनतेंत रुजत आहे. यहुदी व अरब यांना सहकारी म्हणून नांदणें शक्य आहे ही जाणीवहि तेथें रुजत आहे. तेल-कंपन्यांच्या मक्तेदारीविरुद्ध व मजुरांसंबंधींच्या धोरणाविरुद्ध, तसेंच साम्राज्यवादी दडपशाहीविरुद्ध यहुदी व अरब तरुणांनीं एकजूट केल्याचीं उदाहरणें घडत आहेत व संपांमधूनहि दोन्हीं जमातींची संयुक्त ताकद मागें नजरेस पडली आहे.

पण रझाकारी पद्धतीच्या यहुदी व अरब संघांच्या परेडीमुळें व आजच्या चकमकीमुळें सामान्य जनतेचा वर सांगितलेला राष्ट्रवाद आज राखेखालीं दडपलेल्या निखाऱ्याप्रमाणें निष्प्रभ झाला आहे. तथापि आशेची ऊब त्याच निखाऱ्यांत आहे.

आज, हिंदच्या अधिकृत धोरणाप्रमाणें अरब व यहुदी या दोघांना आपण पाठिंबा देत आहों; पण हा पाठिंबा देत असतांना या प्रश्नाच्या मागील पार्श्वभूमीची दखलहि घेतली पाहिजे. या बाबतींत यूनोच्या कमकुवतपणाची जाणीव झाली तरी अखेर यूनोच्या संघटनेला हा कमजोरपणा आणणाऱ्या साम्राज्यवादाबद्दल आपण जागरूक राहिलें पाहिजे. ब्रिटन व अमेरिका या दोन बलाढ्य साम्राज्यवाद्यांनीं ग्रीस, इंडोनेशिया, चीन इत्यादि देशांत जी यादवी पेटविली आहे तिच्यामुळेंच युद्धाचा धोका वाढत चालला आहे, हें आपण ओळखलें पाहिजे. पण आज पाहावें तर अरब मुसलमान आहेत म्हणून त्यांना मदत न करतां यहुद्यांची बाजू घ्या असें सांगण्यास, हिंदुसभेचे पुढारी धजावत आहेत! फाळणीच्या निर्णयानें मध्यपूर्वेंत हलकल्लोळ माजावा व आपलें समाजक्रांतीचें घोडें पुढें दामटतां यावें या हेतूनें सोव्हिएटनें फाळणीला मान्यता दिली असा विलक्षण उलटा प्रचारहि करण्यांत येत आहे! या सगळ्या गोंधळाचा फायदा मात्र खरोखर यादवीच्या आगींत आपली पोळी भाजूं पाहणाऱ्या ब्रिटनला व अमेरिकेला होत आहे.

शक्य तेवढ्या तांतडीनें यूनोमार्फत पॅलेस्टाइनमधला रक्तपात थांबावा, पालक बनूं पाहणाऱ्यांची लुडबूड थांबावी, यहुदी व अरब यांचीं स्वतंत्र राज्यें आर्थिक व सर्वच सहकार्याला तयार व्हावीं व अशा रीतीनें मध्यपूर्वेंत उत्पन्न झालेला महायुद्धाचा धोका नाहींसा व्हावा या दृष्टीनेंच आपण सर्वांनीं या प्रश्नाकडे पाहावें. याच दृष्टीनें चालू संघर्षाची व पार्श्वभूमीची ढोबळ मानानें माहिती देण्याचा प्रयत्न मीं केला आहे. दिल्लीच्या 'फॉरिन रिव्ह्यू'-च्या मे १९४८च्या अंकांतील कांहीं आंकडे व 'इंटेलिजंट मॅन्स गाइड टु पोस्ट-वॉर वर्ल्ड' या मि. कोलच्या ग्रंथांतील कांहीं माहिती मीं उपयोगांत आणली आहे, हें शेवटीं नमूद करतों.

[१४-६-४८.]






स्फुट लेख

# एक मोठा दोष

सेनापति पां. म. बापट

मला मधून मधून वक्ता म्हणून, अध्यक्ष म्हणून सभांना जावें लागतें. मी वक्ता नाहीं, अध्यक्ष होण्याची पात्रताहि मजमध्यें नाहीं, पण कोणाचें अडलें म्हणजे मला बोलावतात व माझी इच्छा नसतांहि मला माझ्या 'गरीब' स्वभावामुळें जावें लागतें. या सभांतून मला एक दोष अनेक वेळां दिसला. वृत्तपत्रें वाचतांनाहि मला तो दोष दिसतो. अर्थात् माझ्या दृष्टीला तो दोष वाटतो. कोणाला तो गुणहि वाटत असेल, नव्हे गुणच वाटत असला पाहिजे. बुद्धिपुरःसर कोणी आपला दोष जनतेपुढें वक्तृत्वपूर्ण भाषेनें ठेवीत नाहीं.

आपला पक्ष जनतेचा उद्धार करणारा, विरोधी पक्ष जनतेला खड्यांत लोटणारा, अशी एक भावना बऱ्याच पक्षनिष्ठ वक्त्यांत व लेखकांत दिसते. ही भावना मानवतेच्या विकासाच्या दृष्टीनें दोष आहे, गुण नव्हे, असें माझें मत आहे.

मानवांचा मेळा या पृथ्वीवर अनेक गट करून नानाविध खटपटी करीत जन्ममरणांतल्या व सुखदुःखांच्या प्रसंगांतून लहानमोठे धडे घेत आपल्या मानवतेचा विकास करीत चालला आहे.

व्यक्तीच्या मानवतेचा विकास हें सर्व घटनांचें ध्येय आहे, घटना घडविणाऱ्या जगदीशाचें ध्येय आहे. गट, पक्ष, संघ; कुटुंब, कुल, समाज; अर्थकारण, धर्मकारण, राजकारण; या सर्व संस्था आणि सर्व चळवळी व्यक्तीच्या विकासासाठींच सर्वेशानें योजिलेल्या आहेत.

व्यक्तीमध्यें जो स्व ( Sui, Soul ) आहे तो सर्वेशाची विभूति आहे. **ईशावास्यम् इदं सर्वम् यत् किंच जगत्यां जगत्** । व्यक्तीच्या परिस्थितींतील प्रत्येक वस्तूंत ईशाची विभूति आहे. या वस्तूंत इतर व्यक्तींचा समावेश होतो, सर्व बाह्य घटनांचा समावेश होतो.

व्यक्तीचा विकास, म्हणजे व्यक्तीच्या 'स्व'-चा विकास. स्व-नें आपलें स्वत्वाचें क्षेत्र वाढवीत वाढवीत सर्वव्यापक करणें, सर्वरूप होणें, ही व्यक्तिविकासाची पराकाष्ठा.

या विकासाचा एक अनुभवसिद्ध मार्ग **ईशावास्यम् इदं सर्वम्** ( हें सर्व ईशव्याप्त आहे ) या सत्याचें अनुस्मरण, नित्यस्मरण आणि या सत्याच्या नित्य जाणिवेला अनुरूप असें वर्तन, म्हणजे " तेन त्यक्तेन भुंजीथाः, मा गृधः, कुर्वन्नेव इह कर्माणि जिजीविषेः शतं समाः ", (१ आयुष्यभर सत्कर्में करीत राहणें, २ गर्व, लोभ सर्वथा सोडणें, ३ देहाचें पालनपोषण, सर्वरूप ईश्वराकडून प्राप्त झालेली अन्नादि सामग्री सर्वार्थ-त्यागानें म्हणजे यज्ञानें विशुद्ध करून तिच्या द्वारां, करीत राहणें ), या आदेशत्रयीचा आदर करून तदनुसार जीवन जगणें, या मार्गानें जाणारे ते आत्मविकासक, न जाणारे ते आत्मविनाशक ( आत्महनः ) असें 'ईशावास्यकार' म्हणतात.

व्यक्तीला देह, इंद्रियें, मन व बुद्धि यांना राबवून आपल्या 'स्व' चा विकास साधावयाचा असतो. जन्मतःच व्यक्तीच्या बरोबर विशिष्ट गुणांनीं व दोषांनीं युक्त असा देह, इंद्रियवर्ग, मन, बुद्धि आणि विशिष्ट








# एक मोठा दोष

मर्यादेपर्यंत विकसन पावलेला स्व असतो. ' व्यक्ति =स्व+देह, इंद्रियवर्ग, मन, बुद्धि ' असें असल्यानें ' व्यक्तीबरोबर स्व–असतो ' ही भाषाहि कांटेतोल नाहीं. असो.

व्यक्तीचें स्वरूप आणि स्व–स्वरूप यांतील अंतर आत्मविकासकानें ध्यानांत बागवून आपलें विकास-कार्य करीत राहिलें पाहिजे. व्यक्तीचें स्व–स्वरूप म्हणजे व्यक्तीच्या स्वच्या स्वचें रूप, अर्थात् ईश्वराचें रूप. व्यक्तीचें स्वरूप म्हणजे विशिष्ट काळीं असलेलें त्याच्या स्वचें विशिष्ट मर्यादेपर्यंत विकास पावलेलें रूप. हें अपूर्ण रूप व्यक्तीला आपल्या देहादिकांवर ईश्वरत्व गाजवून त्यांजकडून ज्याच्या त्याच्या परीनें काम घेऊन क्रमशः अधिक अधिक व्यापक करीत सर्वव्यापी करावयाचें असतें. तें सर्वव्यापी झालें म्हणजे पूर्ण झालें. हाच पूर्ण विकास.

हा विकास क्रमशःच होत असतो. ईशावास्यकारांचा विकासमार्ग सांपडावयासहि अगोदर कांहीं विकास अन्य मार्गानें व्हावा लागतो. "आत्मा वा अरे द्रष्टव्यः, श्रोतव्यः, मन्तव्यः, निदिध्यासितव्यः" (आत्म्याच्या क्रिया पाहा, ऐक, त्यावर मनन कर, आत्म्याच्या [ स्वच्या स्वचा ] ध्यास लावून घे ) या याज्ञवल्क्यानें आपल्या प्रिय पत्नीच्या निमित्तानें आत्मविकासकांना दाखवून दिलेल्या विकासमार्गानें कांहीं टप्पे गेल्यावर ईशावास्यकारांचा मार्ग उपलब्ध होतो.

अशी व्यक्तीच्या मानवतेच्या विकसनाची प्रक्रिया असल्यानें व्यक्तीच्या बुद्धीला तिचें विशिष्ट काम–अनेक प्रश्नांच्या व घटनांच्या बाबतींत योग्य–अयोग्य, श्रेयस्कर–अश्रेयस्कर वगैरे निर्णय देण्याचें काम–जितकें अधिक दिलें जाईल, तितकी ती आत्मविकास अधिक साध्य करूं शकेल.

**दृश्यते तु अग्र्यया बुद्ध्या सूक्ष्मया सूक्ष्मदर्शिभिः** (सर्व भूतांमध्यें वसत असलेला आत्मा सर्वांना प्रकट होत नाहीं, तर सूक्ष्म बुद्धीला–अभ्यासानें सूक्ष्मदर्शी झालेल्या व्यक्तीच्या अग्रगामी, अग्रवेधी, सूक्ष्म बुद्धीला प्रकट होतो ) असें कठोपनिषदामध्यें आवर्जून सांगितलें आहे.

हें सर्व ध्यानांत घेतल्यास पक्षनिष्ठ व्यक्तींनीं आपला पक्ष जनतेचा उद्धार करणारा, विरोधी पक्ष जनतेला खड्डयांत लोटणारा या भावनेनें बोलणें, लिहिणें कसें सदोष आहे तें समजेल.

कॉंग्रेस, सोशॅलिस्ट, कम्युनिस्ट, हिंदुसभा व राष्ट्रीय स्वयंसेवक संघ हे पक्ष घ्या. माझा या पक्षांच्या सभासदांशीं विशेष संबंध येतो व या पक्षांचें लिखाण माझ्या विशेष वाचण्यांत येतें म्हणून हे पक्ष घेतले. या पक्षांपैकीं प्रत्येकांतील कांहीं पक्षनिष्ठ व्यक्ती इतर पक्षांविषयीं अनुदार उद्गार काढतात. जनतेला खड्डयांत लोटण्यासाठीं यांपैकीं कोणताच पक्ष निघालेला नाहीं किंवा कोणाचाच कार्यक्रम जनतेला खड्डयांत लोटण्यासारखा नाहीं. कमी अधिक उद्धारक असेच सर्वांचे कार्यक्रम आहेत.

जनता आपल्याकडे यावी या हेतूनें प्रत्येक पक्षनिष्ठ प्रचारक काम करीत असतो व हें ठीक आहे. पण प्रचार करतांना थोडा संयम राखला तर तें मानवतेला अधिक शोभेल. कोणाच्याहि कार्यक्रमांतील किंवा कार्यपद्धतींतील उणिवा दाखविणें, दोष दाखविणें हें रीतसर आहे. पण कोणाच्याहि हृदयाला घरे पडतील असे शब्द वापरणें हें रीतसर नव्हे असें माझें मत आहे. आपल्या पक्षाच्या सभासदांनीं इतर पक्षांच्या सभांना जाऊं नये, गेल्यास गोंधळ माजवावा असे ' शिस्ती 'चे प्रकार जनतेची व पक्षसभासदांची बुद्धि खुजट आणि कुजट केल्याविना कसे राहतील ? पक्षसभासदांचें व जनतेच्या घटकांचें मन उदात्त व्हावें, बुद्धि सूक्ष्मग्राही व सर्वस्पर्शी व्हावी असा प्रयत्न करणें हा मानवतेच्या विकासाचा मार्ग. हा मार्ग पक्षनिष्ठ माणसानें सोडलाच पाहिजे असें आहे कीं काय ? पक्षनिष्ठा व मानवनिष्ठा एकत्र राहूंच शकत नाहींत काय ? पक्षनिष्ठानें मानवतानिष्ठा सोडल्यास त्याचा स्वतःचा विकासहि कसा व्हावयाचा ?

"मला पूर्ण मानव व्हावयाचें आहे, माझ्या मानव बंधु–भगिनींना मला पूर्णतेकडे न्यावयाचें आहे" हा ध्यास लावून घेतला पाहिजे. "आत्मा वा अरे निदिध्यासितव्यः" (तुझें ध्यान सारखें आत्म्याकडे–तुझ्या पूर्ण रूपाकडे–तुझ्या स्वच्या स्वकडे–लागलेलें असावें ) हा आदेश, उपदेश आम्ही क्षणोक्षणीं आठवीत राहिलों तर आमच्या हातून आमच्या व इतरांच्या विकासाचा मार्ग कळत







न कळत दुर्गम करण्याचें पाप होणार नाहीं. आत्म्याच्या नानाविध क्रिया पाहणें, ऐकणें आणि त्यांवर मनन करून निर्णय घेणें हा विकासमार्ग आपणहि चालत राहूं व आपल्या बंधुभगिनींना चालावयास प्रोत्साहन देऊं असा आपल्या मनाशीं आपण कायमचा करार केला तर त्यांत सर्वांचेंच हित आहे.

याज्ञवल्क्यानें मैत्रेयीला अमृतत्वप्राप्तीचा—पूर्णत्वप्राप्तीचा मार्ग सांगतांना, अपूर्ण जीवात्मा आरंभीं केवळ पतीवर (वा पत्नीवर) प्रेम करतो, नंतर संततीवर, नंतर संततीसाठीं संपत्तीवर, नंतर आपल्या जातीवर, तंतर दुसऱ्या जातीवर, नंतर लोक, देव, वेद, भूतजात (जीवजात) यांवर व शेवटीं सर्वांवर प्रेम करतो (आणि पूर्ण शिवात्मा होतो) असा सामान्य विकासक्र सांगितला आहे.

कोणताहि पक्ष घ्या. त्याचे सभासद विकासाच्या कांहीं पायऱ्या चढून आलेले असतात व त्यांचा पक्ष त्यांना आणखी कांहीं पायऱ्या चढून जाण्यास मदत करीत असतो. जनतेकडे तो जातो, तो अशाकरितां कीं, त्यानें निश्चित केलेल्या विकासयोजनेचा लाभ जनतेला मिळावा. हें निर्दोष उद्दिष्ट आहे. या उद्दिष्टाच्या सिद्धीसाठीं प्रचार करतांना मात्र कांहीं व्यक्तींकडून अतिरेकी वा अत्याचारी भाषेचा दोष घडतो व त्यायोगें त्या व्यक्तींचें व त्याच्या वाचकांचें वा श्रोत्यांचें आध्यात्मिक व बौद्धिक नुकसान होतें, सर्वांच्याच सुसूत्र विकासक्रमांत विघ्नें येतात.

मी सध्यां कोणत्याच राजकीय पक्षांत नाहीं; पण पूर्वीं कॉंग्रेसमध्यें होतों, सुभाषबाबूंच्या पुरोगामी गटांत होतों. पुरोगामी गटांत असतांना एकदां मला एक थोर गट—बंधु म्हणाले, 'बापट, काल तुम्ही कम्युनिस्टांच्या सभेला व्यासपीठावर बसलां होतां; तुमच्या मतांसंबंधानें अज्ञानें गैरसमज होण्याचा फार संभव आहे.' मीं म्हटलें, "मी सर्वांच्याच सभांना जातों, मी जिज्ञासु आहे. सृष्टींत आम्ही बुद्धिविकासासाठीं व आत्मविकासासाठीं आहों आणि बुद्धिविकास प्रश्नाच्या सर्व बाजू ऐकून विचार करण्यानें होतो. म्हणून सर्वांनीं सर्व पक्षांच्या सभांना जावें असें माझें मत आहे. माझ्या पक्षांतील सभासदांना तर मी सांगेन कीं, आपल्या पक्षाची सभा व दुसऱ्या एकाद्या पक्षाची सभा एकाच वेळीं असतील तर तुम्ही त्या दुसऱ्या पक्षाच्या सभेस जावें; कारण, आपल्या सभेंत तुम्हाला जुन्याच गोष्टी ऐकायला मिळणार, दुसऱ्या पक्षाच्या सभेंत कांहीं नवीन प्रक्षोभक वा विचारप्रवर्तक गोष्टी ऐकायला मिळण्याचा संभव आहे. त्या गोष्टी ऐका व त्या ऐकून आपल्या पक्षाच्या नेत्यांना कांहीं शंका विचाराव्याशा वाटतील तर त्या विचारा. तुमच्या शंकांचें सामाधान नीट झालें नाहीं तर, व तो दुसरा पक्ष तुम्हांला श्रेष्ठ वाटला तर त्याच्यांत सामील व्हा. कारण, शेवटीं व्यक्तीचा मानवताविकास हें सर्वश्रेष्ठ ध्येय आहे. पक्षनिष्ठा ही मानवतानिष्ठेपेक्षां कमी मोलाची आहे. ... इत्यादि."

मी १९३१ सालीं महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेस—कमिटीचा अध्यक्ष या नात्यानें दौऱ्यावर असतांना मला वरून आदेश आला कीं, श्री. वासुदेव बळवंत गोगटे यांनीं गव्हर्नर हॉट्सन् यांजवर गोळी झाडली, या कृत्याच्या निषेधपर सभांतून बोलावें. हा आदेश माझ्या दृष्टीनें अव्यापारेषु व्यापार होता. मला हा आदेश पोंचल्या दिवसापासून मी श्री. गोगटे यांच्या कृतीचें समर्थन प्रत्येक ठिकाणच्या सभेंत करूं लागलों. श्री. भाऊसाहेब रानडे-माझे चिटणीस-मला म्हणाले, 'बापट, हें काय ?'. मीं म्हटलें, 'मी अगोदर मनुष्य, नंतर कॉंग्रेस—सभासद व पदाधिकारी. मला या सभासदत्वाची, पदाधिकाराची किंमत मनुष्यत्वाच्या अधिकाराइतकी नाहीं. मनुष्य या नात्यानें माझें असें ठाम मत आहे कीं, श्री. गोगटे यांनीं हॉट्सन् या सर्व जनतेला जुलमी म्हणून दंडार्ह वाटणाऱ्या गव्हर्नरला गोळी घातली यांत त्यांनीं जनतेची मानवोचित सेवाच केली आहे ... वगैरे.' अर्थात् माझ्या गोगटे—समर्थनाबद्दल मला सात वर्षें तुरुंगवास मिळाला. माझ्या सत्यव्रतानें माझा आध्यात्मिक विकास झालेला आहे. माझ्या सत्यव्रताला दंड म्हणून मिळालेला कारावासहि माझ्या आध्यात्मिक विकासाला उपकारकच झाला. पक्षनिष्ठा मानवतानिष्ठेहून कमी मोलाची आहे. गीतेंत पुरस्कारिलेला खलहिंसा—पक्ष अहिंसा—पक्षाप्रमाणेंच जनतेचा उद्धारक आहे. अहिंसा—पक्षाच्या अहिंसा—प्रचारानें जनतेला खड्यांत लोटलें आहे असें म्हणणारे व तोच दोष गीतोपदिष्ट खलहिंसापक्षाला








लावणारे, दोघेहि मानवताविकासाच्या दृष्टीनें अति-रेकी भाषाभाषी आहेत असें माझें मत आहे.

नुकताच मला ‘ जातीयताविरोधी ’ सभांना हजर राहण्याचा व बोलण्याचा प्रसंग दोन तीन वेळां आला. येथें शिवाजी–पार्कवर झालेल्या माझ्या एका भाषणाचें प्रतिवृत्त नवयुगांत मीं वाचलें. इतरत्र त्याचा कांहीं अंश आला असेल. केसरींत कांहीं अंश आलेला मीं पाहिला. ज्या वाचकांना माझें जातीयताविरोधी सभेंतील बोलणें पाहावयास मिळालें असेल, त्यांना माझी अशी विनवणी आहे कीं, पक्षनिष्ठेहून मानवतानिष्ठा श्रेष्ठ आहे, ही गोष्ट लक्षांत ठेवून आपली स्वतःची व आपल्या वाचकांची आणि श्रोत्यांची मानवता जेणेंकरून विकास–मार्गावर पुढें पाऊल टाकील असेंच बोलणें–चालणें करावयाचा त्यांनीं निश्चय करावा.

ही गोष्ट सोपी नाहीं. प्रतिपक्षी खड्ड्यांत जात आहे असा प्रचार करण्याची पक्षनिष्ठांची परंपरा फार जुनी आहे. ईशावास्य उपनिषदांत विद्यापक्षीय म्हणतो, ‘ अन्धं तमः प्रविशन्ति ये अविद्यामुपासते । ’. अविद्यापक्षीय उत्तरतो, ‘ ततो भूय इव ते तमः य उ विद्यायां रताः । ’. सम्भूतिपक्षीय म्हणतो, ‘अन्धं तमः प्रविशन्ति ये असम्भूतिमुपासते ।’. असम्भूतिपक्षीय म्हणतो, ‘ततो भूय इव ते तमः य उ सम्भूत्यां रताः ।’. ईशावास्यकार या पक्षनिष्ठांची समजूत कशी घालतात ? ते म्हणतात, “ बाबांनो, आम्हीं ज्यांच्यापाशीं अध्ययन केलें, त्या आमच्या गुरुजींनीं ‘ विद्येचें फल वेगळें, अविद्येचें वेगळें, अविद्येनें संसार तरून जातां येतें, विद्येनें अमृत–( पूर्णत्व )–प्राप्ति होते;असम्भूतीचें फल वेगळें, सम्भूतीचें फल वेगळें, असम्भूतीनें संसार तरून जातां येतो, सम्भूतीनें अमृत-(पूर्णत्व)-प्राप्ति होते; ’ अशीं आपणांहूनहि श्रेष्ठ अशा ऋषींचीं वचनें आम्हांला शिकविलीं. तेव्हां अंध तमाच्या खड्ड्यांत विद्येचा, अविद्येचा, सम्भूतीचा, असम्भूतीचा कोणताहि उपासक जात नाहीं. संसार नेटका व्हावा व अमृतप्राप्तिहि व्हावी असें वाटत असेल तर विद्या–अविद्या या दोन्हींची उपासना करा, सम्भूति–असम्भूति दोन्हींची उपासना करा. नव्हे, दोन्ही उपासना संसार नेटका व्हावयास अवश्य आहेत, दोन्ही उपासना अमृतप्राप्तीला आवश्यक आहेत. ”. (अविद्या आणि सम्भूति हीं पदें कर्मबोधक आहेत व असम्भूति हें पद विद्याबोधक आहे. वेदान्तानुसार अविद्येचें कार्य व सम्भूतीचें जन्मानें कारण कर्म, विद्येचें कार्य असम्भूति (जन्मबन्धनाश); म्हणून असम्भूतीचा अर्थ लक्षणेनें विद्या, व अविद्या आणि सम्भूति यांचा अर्थ लक्षणेनें कर्म, असा घेणें संदर्भानें योग्य वाटेल तेथें घेतात. ) [ असम्भूति या अर्थानें चौदाव्या श्लोकांत ‘ विनाश ’ शब्द वापरला आहे; कारण, असम्भूति=जन्मबन्धविनाश. ]

प्रिय वाचक, तुम्ही विचार कराल तर तुम्हांला आढळून येईल कीं, कित्येक अन्योन्यविरोधी समजल्या जाणाऱ्या पक्षांचे हेतू व कार्यक्रम फलतः अन्योन्यपूरक आहेत. असो. ज्या दोषासंबंधानें मीं उत्साही पक्षनिष्ठांस सावधगिरीची सूचना या लेखांत दिली आहे, तो दोष माझ्या हातूनहि केव्हां केव्हां घडलेला आहे व यापुढेंहि प्रसंगीं घडण्याचा संभव आहे; पण तो कुपंथ आहे, सुपंथ नव्हे. संयमी भाषण–लेखन हा सुपंथ. या सुपंथाला उद्देशून श्रीतुकोबांच्या शब्दांत मी प्रार्थना करतों कीं,

एकमेकां साह्य करूं । अवघे धरूं सुपंथ ॥

---

# सार-संकलन

## १ विद्वद्रत्न डॉ. के. ल. दप्तरी यांचें अध्यक्षीय भाषण

धर्मनिर्णय-मंडळाचें आठवें अधिवेशन पुण्याला २।३।४ जून १९४८ या दिवशीं भरलें होतें. या अधिवेशनाचें अध्यक्षपद डॉ. के. ल. दप्तरी यांनीं मंडित केलें होतें. या निमित्तानें डॉ. दप्तरी पुण्यास आले असतांना त्यांचीं उपनिषदांच्या बुद्धिनिष्ठ आणि वस्तुनिष्ठ तत्त्वज्ञानावर दोन जाहीर व्याख्यानें झालीं. या व्याख्यानानंतर प्रा. न. र. फाटक यांच्या अध्यक्षत्वाखालीं त्यांचा जाहीर सत्कार करण्यांत आला. या जाहीर सत्कारांत पुण्यांतील अनेक संस्थांबरोबर 'नवभारता'नेंहि आनन्दानें भाग घेतला होता. 'नवभारता'तर्फे सत्कार करतांना आचार्य भागवत यांनीं केलेल्या आपल्या भाषणांत डॉ. दप्तरी यांच्या गुणवैशिष्ट्यांचा उल्लेख करून त्यांच्याविषयीं वाटणारा आपला परम आदरभाव व्यक्त केला : डॉ. दप्तरी हे महापंडित असून त्यांची बुद्धि तर्ककर्कश आणि सर्वतंत्रस्वतंत्र अशी आहे. भारतीय तत्त्वज्ञान, ज्योतिर्गणित, धर्मशास्त्र त्याचप्रमाणें वैद्यकशास्त्र यांमध्यें त्यांचा गाढ व्यासंग असून या सर्व क्षेत्रांत त्यांनीं अत्यंत मौलिक आणि विचारप्रवर्तक असे सिद्धान्त प्रस्थापित केले आहेत. त्यांच्या अगाध विद्वत्तेला त्यांच्या अंगीं असलेल्या सत्यनिष्ठा, सौजन्य आणि लोककल्याणेच्छा या असाधारण गुणांची जोड मिळाली आहे. असहकारितेच्या काळांत झालेला वृत्तिच्छेद खुषीनें स्वीकारून आपल्या तत्त्वनिष्ठेकरितां अत्यंत दारिद्र्याचें जीवन आनंदानें अंगीकारणारा आणि त्याबरोबरच भरीव ज्ञानोपासना आणि लोकसेवा करणारा डॉ. दप्तरीसारखा महापंडित विरळा.

डॉ. दप्तरी यांनीं धर्मनिर्णयमंडळाच्या अधिवेशनांत अध्यक्ष म्हणून जें भाषण केलें तें अत्यंत मननीय आहे. त्यांत त्यांनीं चर्चिलेल्या मुद्द्यांवर धर्मनिर्णयमंडळाच्या अधिवेशनांत ठराव झालेले आहेत. डॉ. दप्तरी यांनीं आपल्या भाषणांत राष्ट्रस्वामित्व अथवा समाजस्वामित्व ( Socialism ) याचा पुरस्कार करून त्यांतच शुद्ध हिंदु धर्माचें सार सांठविलेलें आहे असें जें साधार प्रतिपादन केलें त्यावरून त्यांच्या वयोवृद्ध देहांतील तरुण मनाची साक्ष पटते. धर्मनिर्णयमंडळाच्या अधिवेशनांत या मुद्द्यावर चर्चा होऊन "समाजरचना आणि आर्थिक व्यवस्था यांसंबंधीं उपस्थित झालेल्या लोकशाही, विकेन्द्रीकरण, राष्ट्रस्वामित्व इत्यादि मतांचा धार्मिक दृष्ट्या खोल अभ्यास करून निर्णय तयार करण्याकरितां" एक समिति नेमली गेली. त्या समितीमध्यें डॉ. दप्तरी, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, तर्कतीर्थ रघुनाथशास्त्री कोकजे, श्री. ना. गो. चापेकर आणि आचार्य भागवत हे आहेत.

डॉ. दप्तरी यांनीं धर्मनिर्णयमंडळाच्या अधिवेशनापुढें केलेल्या अध्यक्षीय भाषणांतील कांहीं निवडक उतारे पुढें दिले आहेत:—

"स्वातंत्र्यप्राप्तीनंतर पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरू यांनीं अनेकवार जाहीर केलें आहे कीं हिंदी सरकार धर्मातीत राहील. ता. २६-४-४८ च्या मुंबईच्या चौपाटीवरील सभेंतहि ते म्हणाले, "India would be a secular state and politics would be completely divorced from religion but not devoid of religious ethics which were the fundamentals of all religions." असें धोरण धारण केलें हें त्यांनीं योग्य असेंच केलें आहे. ह्याचा अर्थ ब्रिटिश सरकार जसें कोणाच्याहि धर्मांत आणि समाज








व्यवस्थेंत हात न घालण्याचें धोरण पाळीत होतें, तसेंच धोरण स्वतंत्र हिंदी सरकारहि पुढें पाळणार. म्हणजे ह्या बाबतींत बदल कांहींच झाला नाहीं असें म्हणतां येतें. वरवर पाहतां जरी अशी परिस्थिति आहे, तरी कायदेमंडळांत हिंदूंचेंच बहुमत असल्यामुळें कायदेमंडळें इतर समाजांच्या धर्मांत व समाजव्यवस्थेंत जरी हात घालण्याचें धैर्य करणार नाहींत तरी हिंदुसमाजाच्या धर्मांत व समाजव्यवस्थेंत हात घालण्यास कचरणार नाहींत आणि कायदेमंडळांच्या अशा कृत्यांस पूर्वी ब्रिटिशांचा जो अडथळा होता तोहि आतां राहिला नाहीं. मुंबई इलाख्यांत एकपत्नीत्वाचा कायदा लीलेनें मंजूर झाला ह्यावरून हा बदल स्पष्ट दिसून येतो. कायदेमंडळें समाजव्यवस्थेंत किंवा धर्मांत बदल करण्यास नालायकहि आहेत. कारण त्यांत निवडलेले प्रतिनिधी राजकारणाच्या किंवा अर्थकारणाच्या दृष्टीनें निवडलेले असतात, समाजकारणाच्या किंवा धर्मकारणाच्या दृष्टीनें निवडलेले नसतात. म्हणून धर्मकारणाच्या किंवा समाजकारणाच्या दृष्टीनें समाजकारणास किंवा धर्मकारणास वाहिलेल्या धर्मनिर्णयमंडळाच्या अस्तित्वाची आवश्यकता आजच्या परिस्थितींत अधिकच झालेली आहे. ही बदललेली परिस्थिति हिंदु धर्मास, संस्कृतीस व समाजास घातक होणार नाहीं अशी योजना तयार करून ती घडवून आणणें हें धर्मनिर्णयमंडळाचें आजचें विशिष्ट कर्तव्य आहे......

. . . . . . . . . . .

"येथें उपनिषदांत सांगितलेलें शुद्ध हिंदुधर्माचें सार सांगणें अस्थानीं होणार नाहीं. तें सार पुढील श्लोकांत थोडक्यांत सांगितलें आहे. तो श्लोक असा :—

ब्रह्माद्वैतं स्वापरूपं जीवो ब्रह्मैव फुल्लितम् ।
सर्वात्मस्वत आत्मानं पश्यन् कर्म सदा कुरु ॥

अर्थ :—'ब्रह्म म्हणजे ज्यापासून जगत् उत्पन्न झालें तें झोंपेसारखें द्वैतरहित आहे. बीजाचें जसें सुगंधी व सुंदर फूल होतें तसाच ब्रह्माचा जीव झाला आहे. जीव हा फुललेलें ब्रह्मच होय. म्हणून सर्व जीवांमध्यें मीच आहें असें पाहत सदैव कर्म करावें.' स्वतःच्या सुखाकरितां जसा मनुष्य झटतो, त्याचप्रमाणें त्यानें सर्वांच्या सुखाकरितां मरेपर्यंत झटावें, कर्में कधींच टाकून देऊं नये असा ह्याचा भाव आहे. जीवस्थिति ही मायाजनित नसून विकासानें झालेली आहे व आनंदानुभवाचें स्थान आहे व तो आनंद वरील प्रकारानें कर्म करीत राहिल्यानें प्राप्त होतो असाहि भाव ह्यात गर्भित आहेच. मनुष्यास प्राप्तव्य अशा स्थितीचें वर्णन करतांना मांडूक्योपनिषदांत "एकात्मप्रत्ययसारं" असें विशेषण योजलें आहे. ह्याचा सरळ अर्थ "सर्वांमध्यें एकच आत्मा आहे असा प्रत्यय जिचें सार आहे ती" असा आहे. कोणताहि प्रत्यय जागेपणींच असतो. म्हणून हें जागृतीचें वर्णन आहे हें निश्चित आहे. जागेपणीं असा प्रत्यय ज्याला असेल तो सर्वांच्या सुखाकरितां सतत झटत राहील हेंहि निश्चित आहे. असा हा सरळ, सुंदर आणि खुला अर्थ असूनहि भाष्यकारांनीं तेथील वर्णनांत मोठा गूढ अर्थ आहे असें दाखवून सगळ्या हिंदूंना मोहांत पाडलें आणि त्यांचा नाश केला. हिंदुधर्मावर वाढलेलीं अशीं हीं बांडगुळें कापून काढून हिंदुधर्म शुद्ध स्वरूपांत आविष्कृत व प्रसृत करणें हें कार्य धर्मनिर्णयमंडळाकडून यापुढें सतत होत राहिलें पाहिजे अशी माझी मनोभावना आहे. हें हिंदुधर्माचें शुद्ध स्वरूप प्रत्येकाच्या मनासमोर सतत राहील असा कोणता तरी आचार प्रत्येकास ह्या परिषदेनें लावून द्यावा.

"वर दाखविलेलें शुद्ध हिंदुधर्माचें सार भरतखंडांत पसरेल तरच सध्यां उतूं आलेले व्यक्तींव्यक्तींमधील, जातींजातींमधील आणि धर्मांधर्मांमधील तंटे विराम पावतील. ह्या साराचा अर्थकारणावर( Economics-वर) काय परिणाम झाला पाहिजे ह्याचा येथें विचार करणें जरूर आहे. सांप्रत जो कोणी श्रम करून जें मिळवील तेवढें त्याच्या मालकीचें धन. तेवढ्यानें त्याला जें सुख मिळेल तेवढें त्यानें भोगावें. श्रम करूनहि धन न मिळालें किंवा कमी मिळालें किंवा श्रम करण्याचीं साधनेंहि जवळ नसल्यामुळें धन न मिळालें तर त्यानें दुःख भोगावें. ह्याला व्यक्तिस्वामित्व ( Capitalism ) म्हणतात. ही पद्धति अनादिकालापासून चालू आहे. आणि तिच्यांतील दोष नाहींसा करण्याकरितां धर्मग्रंथांत दानधर्माची प्रशंसा केलेली असते. पण ह्या दानप्रशंसेमुळें तिच्यांतील दोष नाहींसा झालेला नाहीं. यांत्रिक युग

आल्यापासून तर हा दोष फारच वाढला आहे. श्रीमंत अधिकाधिक श्रीमंत होत आहेत आणि गरीब अधिकाधिक गरीब होत आहेत. आणि त्यामुळें धनाकरितां भांडणें होत आहेत व तीं उतूं जाऊं लागलीं आहेत. प्रत्येकास धनाची अमर्याद हांव सुटली आहे. काळा बाजार, लांच खाणें, कोर्टांत भांडणें, लूट, मारामाऱ्या, जातींजातींतलि भांडणें, धर्मांधर्मांतलि भांडणें, अधिकाराच्या जागेसाठीं भांडणें हीं सारीं धनाच्या अमर्याद हांवेचीं रूपें आहेत. प्रत्येकाला असें वाटतें कीं धन असल्याशिवाय आपणांस सुख मिळणार नाहीं; म्हणून तो येन केन प्रकारेण धन मिळविण्याच्या मार्गे लागतो, त्याचा हा परिणाम आहे. हें टाळण्याचा एकच उपाय दिसतो. तो हाच कीं, धन ही संस्थाच काढून टाकावी. व्यक्तिस्वामित्व ही पद्धतीच नष्ट करावी. कोणाच्याहि श्रमानें जें फळ उत्पन्न होईल तें त्याच्या मालकीचें न समजतां राष्ट्राच्या मालकीचें समजावें. राष्ट्रानें प्रत्येकाकडून त्याला जे शक्य असतील ते श्रम करवावे व त्याला लागतील त्या वस्तू पुरवाव्या. ह्याला राष्ट्रस्वामित्व किंवा समाजस्वामित्व ( Socialism ) म्हणतात. ह्यांत प्रत्येकाला आपल्या शक्तीप्रमाणें काम करावें लागतें व प्रत्येकाला त्याच्या गरजेप्रमाणें मिळतें व त्यामुळें प्रत्येकजण सुखी व संतुष्ट असतो व त्याला दुसऱ्याशीं भांडण्याचें अर्थात् कांहीं कारणच उरत नाहीं. ह्या पद्धतींतच शुद्ध हिंदुधर्माच्या साराची पाळणूक आहे. कारण हींत प्रत्येक मनुष्य आपल्या श्रमाचें अल्प किंवा मोठें फळ सर्वांच्या सुखाकरितां राष्ट्रास अर्पण करतो. म्हणून राष्ट्रस्वामित्वपद्धति स्थापन करणें ही गोष्ट हिंदुधर्माला अनुसरणारी अशीच आहे. महाभारतांत म्हटलें आहे:—" अतिरिक्तैः संविभजेत् भोगैरन्यानकिंचनान् " ( म. भा. शांतिपर्व, अ. २५९, श्लो. २३. ). म्हणजे आपण भोगून जें उरेल तें दुसऱ्या दरिद्री मनुष्यांस देऊन टाकावें. भागवतांत म्हटलें आहे:—' न यस्य स्वः पर इति वित्तेष्वात्मनि वा भिदा । सर्वभूतसमः शान्तः स वै भागवतोत्तमः ॥' ( भागवत, स्कंध ११, अ. २, श्लो. ५२.) म्हणजे जो धनाविषयीं किंवा शरीराविषयीं 'हें माझें व हें परक्याचें ' असा भेद मानत नाहीं, सर्व भूतांशीं सारखेपणानें वागतो व शांत असतो म्हणजे भांडत नाहीं, तोच उत्तम ईश्वरभक्त होय. मनुस्मृतींतहि वैश्याचें म्हणजे धनवानाचें कर्तव्य "दद्याच सर्वभूतेभ्यो ह्यन्नमेव प्रयत्नतः (अ. १०, श्लोक ३३३.). म्हणजे सर्व भूतांना त्यानें प्रयत्न करून अन्नच द्यावें अशा शब्दांनीं सांगितलें आहे. ह्या वचनांतील तत्त्वाला व्यावहारिक, व्यवस्थित व निश्चित रूप देणें म्हणजेच समाजस्वामित्वपद्धति स्थापन करणें होय. म्हणून ह्या परिषदेनें राष्ट्रस्वामित्वनिष्ठ पद्धतसि आपली संमति आहे असें जाहीर करावें. कारण, हा प्रश्न सध्यां भरतखंडांत फार जोरानें प्रतिपादला जात आहे. म्हणून ह्या वेळीं राष्ट्रास दिशा दाखविणें जरूर आहे.

"नवीन ' हिंदु कायदा '( Hindu-Code ) हाहि सांप्रत वादाचा विषय आहे व त्यावरहि ह्या परिषदेनें आपलें मत देणें आवश्यक आहे. हा कायदा नुकताच वरिष्ठ कायदेमंडळापुढें मांडला गेला आहे. ब्रिटिश सरकारनें नेमलेल्या राव—कामिटीनें तो तयार केलेला आहे आणि हिंदुकायद्यांत प्रतिपादिलेल्या बहुतेक सर्व सुधारणा त्यांत अंतर्भूत केलेल्या आहेत. हिंदुकायद्याचा व त्यांत आवश्यक असलेल्या सुधारणांचा धर्मनिर्णयमंडळाच्या मागील परिषदांत विचार झालेला आहे.

" या विचाराच्या दृष्टीनें पाहतां ह्या नवीन होऊं घातलेल्या हिंदुकायद्याची धांव धर्मनिर्णयमंडळाच्या ठरावांच्याहि पुढें आहे. म्हणून ह्या परिषदेस हिंदुकायद्यांतील सुधारणांचा फेरविचार करणें जरूर झालें आहे. विचार करावयाचे मुख्य मुद्दे पुढें देतों:— (१) मुलीचा वारसा—हक्क, (२) पत्नीच्या वारसाहक्काच्या मर्यादा, (३) एकपत्नीत्वाचे अपवाद, (४) विवाहांतील सापिंड्यमर्यादा, (५) विवाहविच्छेदाचे प्रसंग. ह्या प्रत्येकाविषयीं पृथक् पृथक् विचार करूं.

" (१) मुलीचा वारसा—हक्कः—धर्मनिर्णयमंडळानें मागें मिताक्षराकारांच्या मतास अनुसरून ठरविलें आहे कीं, अविवाहित मुलीसच मुलाच्या हिस्स्याच्या चतुर्थांशायेवढा हिस्सा मिळावा. नवीन कायद्यानें मुलगी विवाहित असो किंवा अविवाहित असो, तिला मुलाच्या द्वितीयांशाएवढा हिस्सा मिळेल. मला वाटतें कीं, धर्मनिर्णयमंडळानें नवीन

हिंदुकायद्याची ही योजना पसंत करावी. स्त्रियांचें पारतंत्र्य घालवून त्यांची स्थिति सुधारण्याकरितां नवीन कायद्यानें योजलेला हा हक्क स्त्रियांना देणें योग्य आहे. आज पुरुषहि स्त्रियांना हा हक्क देण्यास अनुकूल असलेले दिसतात. इतर समाजांतील स्त्रियांना असा हक्क आहे; त्यामुळें त्यांची स्थिति हिंदु स्त्रियांपेक्षां पुष्कळ चांगली आहे. हिंदू स्त्रिया इतर समाजांतील स्त्रियांच्या मागें राहणें चांगलें नाहीं हाहि विचार आपण केला पाहिजे. ज्या बापाला आपल्या मुलींना असे हिस्से मिळूं नयेत असें वाटत असेल त्याला मृत्युपत्रानें इष्ट ती योजनाहि करतां येतेच. एकूण ह्या नवीन कायद्याचें धोरण मान्य करावें असें मी सुचवितों.

"(२) पत्नीच्या वारसा-हक्काच्या मर्यादाः— अगदीं प्राचीन काळीं पत्नीला नवऱ्याच्या मालमत्तेंतील वारसाहक्कानें मिळणाऱ्या भागाची विल्हेवाट करण्याचा पूर्ण अधिकार होता. मध्यंतरींच्या काळांतच तो अधिकार नियंत्रित केला गेला व तो अधिकार सांप्रतहि तसाच नियंत्रित आहे. कायदेशीर गरज पडते तेव्हांच तिला सांप्रत आपल्या हिश्शाची विल्हेवाट करतां येते. नवीन कायद्यानें हें नियंत्रण अजिबात काढून टाकलें आहे. धर्मनिर्णयमंडळानें पूर्वी असें ठरविलेलें आहे कीं, पतीचे अगदीं जवळचे विशिष्ट नातलग जिवंत असतील तोंपर्यंत हें नियंत्रण असावें, इतर प्रसंगीं नसावें. मला वाटतें कीं ह्या अल्प नियंत्रणाचाहि धर्मनिर्णयमंडळानें आग्रह धरूं नये. 'कायदेशीर गरज' ही गोष्ट नेहमीं [illegible]ादग्रस्तच असते व ह्यामुळें विल्हेवाट करतांना ती [illegible]वाट करणें जरूर असलें तरी स्त्रियांची मोठी [illegible]गा होते. ती दूर करणें जरूर आहे. पतीच्या कुचंब[illegible] जवळच्या नातलगांचें नुकसान होऊं नये हेंहि अगदीं [illegible] खरें आहे. मला या अडचणींतून एक मार्ग तितकें[illegible] [illegible]ाचा विचार करावा. तो असाः—पतीकडून सुचतो [illegible] वारसाह[illegible]ानें मिळालेल्या स्थावर अगर जंगम मालाचें किंवा तो विकून आलेल्या धनाचें पत्नीनें दान करूं नये. येवढेंच नियंत्रण पत्नीवर ठेवावें. ह्या नियंत्रणानें विल्हेवाट करतांना तिची कुचंबणा होणार नाहीं आणि पतीच्या नातलगांचें अयोग्य नुकसानहि होणार नाहीं.

"(३) एकपत्नीत्वाचे अपवादः— सांप्रत एक पत्नी चांगली असतां दुसरी करूं नये असें नैतिकच बंधन आहे. दुसरी पत्नी करण्यास कायद्याची कोणतीच आडकाठी नाहीं. नवीन कायद्याप्रमाणें एक पत्नी आहे तोंपर्यंत दुसरी केव्हांच करतां यावयाची नाहीं. मुंबई इलाख्यांत असा कायदा मंजूरहि झाला आहे. असा कायदा चालू असतांना जर कोणास दुसरी पत्नी करावयाची असेल तर त्यानें पहिल्या पत्नीच्या विवाहविच्छेदाचा निर्णय कोर्टाकडून मिळविला पाहिजे. ही योजना हिंदू मनास फारच क्रूरपणाची व दुःखदायक वाटते. कारण, ह्या योजनेप्रमाणें नेपोलियनवर जसा विवाहविच्छेदाचा क्रूर प्रसंग येऊन पडला, तसाच पुष्कळांवर येण्याचा संभव आहे. एकादी पत्नी पत्नीत्वाला नालायक झाली, तरी तिचा पत्नीत्वसंबंध तोडून टाकण्यास हिंदू मन तयार होत नाहीं व प्रेमाच्या व दयेच्या दृष्टीनें तें योग्यच आहे. अशा प्रसंगीं त्यास दुसरी पत्नी करण्याची परवानगी कोर्टाकडून मिळण्याची नवीन कायद्यांत योजना असावी. ज्या ज्या प्रसंगीं विवाहविच्छेद मागण्याचा पतीस कायद्यानें अधिकार दिला असेल, त्या त्या प्रसंगीं त्याला त्याच्या इच्छेप्रमाणें त्याची ती इच्छा अयोग्य नसल्यास द्वितीय पत्नी करण्याची परवानगी मागण्याचाहि अधिकार असावा. आणि पतीनें आणलेल्या विवाहविच्छेदाच्या दाव्यांत पत्नी पतीला दुसरी पत्नी करण्याची परवानगी मिळावी अशी इच्छा करीत असेल व ती तिची इच्छा अयोग्य नसेल, तर पतीची विवाहविच्छेदाची मागणी नामंजूर व्हावी. नवीन होऊं घातलेल्या कायद्यांत हा येवढा बदल करणें अत्यंत आवश्यक आहे. असा बदल केला तर पति व पहिली पत्नी ह्यांमधील प्रेमाचा अकारण विच्छेद टळेल. आणि विवाहविच्छेदामुळें पत्नीवरच येणाऱ्या अनेक आपत्ती टळतील. माझें स्वतःचें मत तर असें आहे कीं, पत्नीसहि तिच्या इच्छेनुसार विवाहविच्छेद मागण्याऐवजीं दुसरा पति करण्याची परवानगी मिळावी. कारण, एक पति जसा अनेक पत्न्यांवर प्रेम करूं शकतो तसेंच एक पत्नीहि अनेक पतींवर प्रेम करूं शकते. द्रौपदीचें उदाहरण आपणांस माहीत आहेच. आणि पत्नीलाहि पहिल्या पतीशीं विवाहविच्छेद

करणें फार क्रूरपणाचें कृत्य वाटूं शकतें. पण आज हिंदुसमाजांतील पुरुष ह्या गोष्टीस तयार होणार नाहींत हें मी जाणून आहें. म्हणून मी ह्या गोष्टीचा आग्रह धरीत नाहीं.

" (४) विवाहांतील सापिंड्य–मर्यादा*:–सुप्रजाजननशास्त्राच्या दृष्टीनें चांगल्या गुणांच्या भावाबहिणींतच विवाह केले पाहिजेत. गुरें उत्पन्न करणारे असें करतातच. परंतु मनुष्याला हा नियम लावण्यांत अडचण उत्पन्न होते. भावांबहिणींच्या विवाहास परवानगी ठेवल्यास अकालीं प्रेम उत्पन्न होऊन आवश्यक अशा ब्रह्मचर्याचा विघात होण्याचा संभव आहे. म्हणून बहुतेक मनुष्यसमाजांत भावांबहिणींच्या आणि अगदीं जवळच्या नातलगांच्या विवाहास प्रतिबंध असतो. अगदीं प्राचीन काळीं आपल्या समाजांतील विवाहप्रतिबंधक नियम कसा होता हें पुढील शतपथ–ब्राह्मणांतील वचनावरून दिसून येतें. तें वचन असें:–

तद्वा एतत् । समान एव कर्मन् व्याक्रियते ।
तस्मादु समानादेव पुरुषादत्ता चाद्यश्च जायेते ।
इदं हि चतुर्थे पुरुषे तृतीये संगच्छावह इति-
विदेवं दीव्यमाना जात्या आसत एतस्मादु
तत् ॥ ६ ॥

—शतपथ–ब्राह्मण, १–८–३–६

अर्थः—'तें हें आहे. समानांमध्येंच कर्माचा उत्कर्ष होतो; म्हणून उपभोग घेणारा पति आणि उपभोग्य पत्नी हीं दोघेंहि एकाच पुरुषापासून उत्पन्न झालेलीं असतात. ह्याच कारणामुळें आपण, चवथ्या पिढींत किंवा मध्यें स्त्री असल्यास तिसऱ्या पिढींत विवाहानें एकत्र होऊं शकतो, हें जाणत असल्यामुळें जातिबांधव खेळत आणि आनंद करीत राहतात'.

"ह्या वचनांत समानगुणांच्या स्त्री–पुरुषांच्या विवाहापासूनच कर्मांचा उत्कर्ष होतो असें मान्य करून व त्याकरतां एकाच पुरुषाच्या संततीमध्येंच विवाह झाले पाहिजेत असें सांगूनहि, चवथ्या पिढींत (किंवा मध्यें स्त्री असल्यास तिसऱ्या पिढींत) विवाह करावे असें सांगितलें आहे. ह्याप्रमाणेंच चुलतचुलत भावांबहिणींचे विवाह होऊं शकतात. मामाच्या मुलींशीं, आतेच्या मुलींशीं किंवा मावशीच्या मुलींशीं विवाह होऊं शकत आणि केले पाहिजेत. मामाच्या मुलींशीं झालेले ऐतिहासिक विवाह प्रसिद्ध आहेत आणि अजूनहि चालू आहेत. वेदाच्या एका प्रसिद्ध वचनांतहि मामाच्या मुलींशीं व आतेच्या मुलींशीं होत असलेल्या असल्या विवाहांचा निर्देश आहे. आईच्या व बापाच्या सपिंडांशीं विवाह करण्यास प्रतिबंध आहे असें महाभारतांत सांगितलें आहे. तरी, 'सपिंड' ह्याचा अर्थ शतपथांतील वरील वचनांशीं जुळण्याकरितां 'एकाच स्वयंपाकांत दररोज जेवणारे' असा केला पाहिजे. भाऊबहिणी एकाच स्वयंपाकांत लहानपणीं दररोज जेवतात म्हणून तीं सपिंड; आईबाप व मुलें एकाच स्वयंपाकांत दररोज जेवतात म्हणून तीं सपिंड. चुलतभाऊ व बहिणीहि लहानपणीं बहुतकरून दररोज आपल्या आजाआजींच्या स्वयंपाकांत जेवतात म्हणून तीं परस्परांचे व आपल्या आजाआजींचीं सपिंड. ह्यानंतर बहुधा कुटुंब फुटतेंच आणि चुलतचुलत भाऊबहिणीला आपल्या पणजापणजींच्या स्वयंपाकांत दररोज जेवण्याचा प्रसंग येत नाहीं, म्हणून ते सपिंड नव्हत. असेंच मामाची मुलगी, आतेची मुलगी किंवा मावशीची मुलगी ह्यांचेंहि आहे. ह्यावरून "सपिंड" ह्याचा अर्थ पूर्वी निराळा होता व तो पुढें बदलत गेला आणि त्यामुळें विवाहप्रतिबंध फार विस्तृत होत गेला हें उघड आहे. म्हणून "सपिंड" शब्दाचा अर्थ शतपथांतील वचनांशीं जुळेल असा घ्यावा. असें केल्यानें पुष्कळ फायदा आहे. दांपत्यामध्यें गुणसाधर्म्य पाहिजे, तें पुष्कळांशीं सहज साधेल आणि विवाह जुळविणें सोपें होईल. कारण, जवळच्या नातलगांमध्यें साहजिकच प्रेम असतें व तें प्रेम आर्थिक अडचणींना सहज जिंकूं शकतें. नवीन होऊं घातलेल्या कायद्यांत सर्वांशीं नाहीं तरी जवळजवळ

---

* याच विषयावर डॉ. दप्तरी यांनीं अधिक विस्तारानें लिहिलेला लेख 'नवभारता' च्या पहिल्या (ऑक्टोबर १९४७च्या) अंकांत आढळून येईल.
—का. सं.








अशीच योजना आहे. ती सर्वांशीं शतपथाच्या नियमांशीं जुळेल अशी करावी.

"(५) विवाहविच्छेदाचे प्रसंग:—नवीन कायद्यांत दिलेले असे प्रसंग योग्य असले तरी ते अपुरे आहेत असें वाटतें. पति पतित्वाचें किंवा पत्नी पत्नीत्वाचें कार्य करण्यास रोग वगैरे कोणत्याहि कारणांनीं असमर्थ झाल्यास विवाहविच्छेद मिळावा असाहि एक नियम असावा.

• "विवाहापासून पंधरा वर्षांनंतर विवाहविच्छेद होऊं नये असा धर्मनिर्णयमंडळाचा पूर्वीचा ठराव आहे, तोहि ह्या कायद्यांत घातला जावा. कारण पतिपत्नी ह्या नात्यानें इतका दीर्घ काळ एकत्र राहिल्यानंतर विवाहविच्छेदाची खरी आवश्यकता उत्पन्न होईल अशी कल्पना करवत नाहीं; आणि केवळ चैनीकरितां विवाहविच्छेद होऊं देणें इष्ट नाहीं. ... ..."

## २ प्रत्येक हिंदवासियाला नागरिकत्वाबद्दल अभिमान आणि आनंद वाटला पाहिजे.

"वास्तविक दृष्टीनें बोलायचें तर आजचा प्रसंग हा इतिहासांत चिरसंस्मरणीय राहील यांत संशय नाहीं. कारण, ही पहिलीच वेळ आहे कीं ज्या वेळीं हिंदचे मुख्य प्रधान आणि त्यांचें मंत्रिमंडळ यांच्या इच्छेनुसार हिंदी राज्याच्या प्रमुख पदाचा मान आणि कर्तव्यें एका हिंदी मनुष्यावर--- हिंदच्या पुत्रावर—सोंपवलीं आहेत. मला या पदावर बसवून माझा जो अपूर्व सन्मान केला आहे त्याबद्दल मी अत्यंत ऋणी आहें. हें ऋण माझ्याकडून फिटणें कधींहि शक्य नाहीं. माझ्यावर जो विश्वास ठेविला आहे त्या विश्वासाला साजेशी कृति प्रत्येक वेळीं माझ्या हातून घडावी अशी माझी मनापासून इच्छा आहे.

माझ्या पूर्वी या पदावर अधिष्ठित असलेल्या सद्गृहस्थांनीं आपल्या अधिकाराच्या संस्मरणीय काळांत जें कार्य केलें तें अनासक्ति, तत्परता आणि उत्साह या गुणसमुदायाचा एक आश्चर्यकारक आदर्श आहे. ते या देशाचे नसतांनाहि या देशाचेच आहेत अशा बुद्धीनें त्यांनीं कार्य केलें. एकादें काम नेमून दिलेलें असतांना तें ज्या कर्मयोगी वृत्तीनें करावें असें आपल्या धर्म–ग्रंथांत सांगितलें आहे त्या वृत्तीनें त्यांनीं तें केलें आहे. अशा महान् व्यक्तींच्या मागून या पदावर मी आलों आहें खरा, परंतु माझी गोष्ट त्यांच्याहून निराळी आहे. शस्त्रास्त्रविद्या त्याचप्रमाणें मुत्सद्दीगिरी यांमध्यें जो अननुभवी आहे अशाला जी कसोटी योग्य, तिच्यावरच माझ्या कार्याचें मोजमाप व्हावें अशी माझी अपेक्षा आहे.

आपणांपुढील प्रश्न कल्पनेबाहेर वाढले असून ते इतके विकट आहेत कीं त्यांच्यापुढें अत्यंत मोठे धैर्यवंतहि विचलित होणें शक्य आहे. माझ्या ज्या सहकाऱ्यांवर राज्यकारभार सोंपविला आहे, ते जर कोणत्या एका एकमेव इच्छेनें प्रेरित झाले असतील तर ती इच्छा ही कीं, आपल्या लोकांनीं सुखी व्हावें आणि आपल्या देशाचें नांव निष्कलंक आणि उज्ज्वल राहावें. हाच एक ध्यास त्यांना आहे आणि या बंधनामुळेंच ते एकत्र येऊन काम करीत आहेत. त्यांचा अनुभव विशाल आहे आणि चारित्र्य उदात्त हि. त्यांचा हृदयस्थ हेतु साध्य करून घ्यावयाचे सामर्थ्य परमेश्वर त्यांना देवो ! माझ्या पदावरून योग्य ती मदत त्यांना करण्यास मला केव्हांहि अभिमानच वाटेल.

आपल्या हद्दींतील प्रत्येकजण, मग तो कोणत्याहि जातीचा, धर्माचा वा वंशाचा असो,—त्या प्रत्येकाला हिंदच्या नागरिकत्वाबद्दल अभिमान आणि आनंद वाटावे अशा तऱ्हेचें धोरण ठेविण्याचें ब्रीद हिंदुस्थाननें अंगीकारलें असून तें कालत्रयींही बदलणें शक्य नाहीं. कोणाच्याहि—मग तो पुरुष असो वा ती स्त्री असो, तो अगर ती अमक्या एका विशिष्ट जमातीचा वा जमातीची आहे म्हणून— नागरिकत्वाच्या हक्कास बाध येणार नाहीं.

कुलपरंपरागत हक्कानें किंवा जुलूमजबरदस्तीनें राज्य करण्याचे दिवस आतां हिंदुस्थानांत संपले आहेत. कोणत्याहि प्रदेशामधल्या, कोणत्याहि वंशाच्या वा धर्माच्या समाजाला जुलूमजबरदस्तीनें किंवा इतर लोकांच्या खुषीच्या आणि संपूर्ण सहकार्यावांचून, परस्पर देवाणघेवाणीशिवाय आपला अभ्युदय करून घ्यावयाची किंवा सुखी राहावयाची आशाच नको. म्हणूनच सर्व प्रकारचा जातीय आणि प्रादेशिक निराळेपणाचा अभिमान टाकून देणें आणि प्रत्येक समाजांतील बुद्धिमंतानीं सर्व राष्ट्राची सेवा करण्याचा चंग बांधणें आवश्यक आहे.

निरनिराळ्या समाजांनीं आपल्या भोंवतीं भिंती बांधण्याऐवजीं ठिकठिकाणीं दूरवर पसरून एकमेकांत मिसळावयाचें व्यापक धोरण ठेविलें पाहिजे.

हल्लीं ज्यामुळें हिंदुस्थानच्या शांततेचा भंग होत आहे त्या गोष्टीला सार्वजनिक कायद्यांतलें पारिभाषिक असें कांहींहि नांव जरी दिलें तरी ती एक शुद्ध अंतःस्थ यादवी आहे, दुसरें तिसरें कांहीं नाहीं! आणि तो शुद्ध मूर्खपणा आहे! देशाच्या राजकीय फाळणीला आणि देश द्विधा होण्याला आपण संमति दिली असली तरी तदनुसार आपल्या अर्थव्यवस्थेची फाळणी झालेली नाहीं. अर्थव्यवस्थेची फाळणी व्हायला तेवढी सवडच मिळालेली नाहीं. तरी पण अर्थव्यवस्थेची अशी फाळणी होऊं शकेल कीं काय याबद्दल शंकाच आहे. आपण परस्परांवर कमालीचे अवलंबून आहों. आपण कांहींहि केलें तरी परस्परांना सांधणारे असे कांहीं जिव्हाळ्याचे संबंध राहतीलच कीं ते कधींहि तुटणें शक्य नाहीं. युगानुयुगें चालत आलेल्या प्रबळ शक्तींच्या बळानें जेथें सौंदर्याचें आणि आनन्दाचें गोकुळ नांदत होतें तेथें तंटेबखेडे आणि दुःख माजवून त्याचा विचका करणें हा शुद्ध मूर्खपणा होय.

शहाणपणा सुचावा म्हणून आपण प्रार्थना करूं या. सुविचार रुजून वाढीस लागतील, मोहस्वरूपी दुष्टपणा आणि निर्बुद्धपणा माजून त्यांच्या राना-खालीं ते सुविचार नष्ट होणार नाहींत अशी कृति आपण करूं या.

जगांतील सर्व प्रदेशांमधून थोर सज्जनांचे आशी-र्वाद आणि तशाच त्यांच्या सदिच्छा मला मिळाल्या आहेत. माझ्या हातून चुका होऊं नयेत म्हणून त्या सर्वांची मला मदत होवो! आणि मला दिलेल्या पदावर मी काम करीत असतांना आपल्या लोकांची सेवा घडवून आणण्याचें सामर्थ मला लाभो!".

—श्री. **चक्रवर्ती राजगोपालाचार्य,**
गव्हर्नर–जनरल

[अधिकारस्वीकार–प्रसंगीं केलेल्या भाषणाचा अनुवाद. ता. २१–६–४८].

———

**जेरूशॅलेम—**

जेरूशॅलेम किती निर्घृण आहे, त्यांत केवढा तळतळाट भरलेला आहे, हें जीझस ख्रिस्ताला माहीत होतें. जेरूशॅलेमला उद्देशून त्यानें कळवळून असे उद्गार काढले आहेत—:"जेरूशॅलेम! ज्यानें धर्मद्रष्ट्या संतांची हत्या केली आहे, ज्यानें साधुपुरुषांना दगडांनीं जिवें मारलें आहे असें हें जेरूशॅलेम! कोंबडीनें आपल्या पिलांना गोळा करून ज्याप्रमाणें आपल्या पंखाखालीं घालावें, त्याप्रमाणें या हतभागी शहरांतील लोकांना वात्सल्यानें किती तरी वेळां मीं एकत्रित केलें आहे! पण छे:! जेरूशॅलेमला तें कोठलें आवडणार! बा जेरूशॅलेम नगरा! बघ, बघ एकदां तुझ्या या ओसाड, उजाड घरांकडे! मी टाहो फोडून सांगत आहे. माझी वाणी लक्षांत ठेव. तुझ्या तोंडांतून जेव्हां 'जो प्रभूचें नांव घेऊन येईल तोच खरा पवित्र आणि धन्य महात्मा' असे उद्गार निघतील, तेव्हांच मीं तुझ्या दृष्टीस पडेन; तोंपर्यंत मी तुझ्या दृष्टीस पडणार नाहीं."

—**मॅथ्यू २३,** सूक्त ३७.








वर्ष पहिलें
अंक दहावा

# नवभारत

जुलै
१९४८

## या अंकांतील जाहिराती व जाहिरातदार

सु. रा. ग्रंथमाला : जे. अ‍ॅण्ड. एम्. को. : आयडियल फर्निचर मार्ट : धि सेंट्रल पॉटरीज : श्रीधूतपापेश्वर लि.

# औद्योगिक-वृत्त विशेष

( पॅरामाऊंट पब्लिसिटी सिंडिकेट लि. मार्फत )

**हिंदुस्थानांत सध्यां सिमेंटचें उत्पादन** सालिना ३० लक्ष टन होतें. या चार वर्षांत नवीन कारखाने काढून हें उत्पादन दुपटीवर नेण्याचें सरकारनें ठरविलें आहे. सिमेंटचें एकूण तेवीस कारखाने आज चालू असून त्यापैकीं 'असोसिएटेड सिमेंट' गटाच्या मालकीचे तेरा आहेत. डालमियांचे पांच मोठे कारखानेही काम करीत आहेत. मुंबई इलाख्यांत वरील कारखान्यापैकीं एकही कारखाना नसल्यानें मुंबई सरकारनें बागलकोट येथील कारखान्याची जी योजना पुरस्कारली आहे तीमुळें वर्षास एक लक्ष टन सिमेंट उत्पन्न होईल. संयुक्तप्रांतांत दोन कोटी रु.चा कारखाना काढावयाचा असून त्यांतून रोज ७०० टन सिमेंट निघेल.

अल्प भांडवली ग्रामोद्योग म्हणून आगपेट्या [illegible]ार करण्याच्या उद्योगास महाराष्ट्रांत वाव आहे. त[illegible]निक लांकडावर रासायनिक प्रयोग करुन तें स्था[illegible] त्यांच्या उपयोगी बनवितां येतें. सांगलीस आगपेट[illegible] कारखाना लवकरच सुरूं होणार आहे. असा एक[illegible]त अल्पसा मोबदला वा भागीदारी पत्क-या बावती[illegible]रून समग्र माहिती व मदत देण्यास **श्री. द. व. विनीवाले** ( ५२५ बुधवार, पुणें २ ) हे तयार आहेत.

फार्मास्युटिकल औषधें, रसायनें वगैरे माल तयार करणेंसाठीं **वरळी केमिकल वर्क्स लि.** ही कंपनी स्थापन झाली असून मे. डहाणूकर अँड सन्स् लि. हे तिचे मॅनेजिंग एजन्टस् आहेत.

**नानूज ब्रास वर्क्स लि.** (२६९ अे, मुंबई४) या कंपनीनें ५ लक्ष रु. भांडवल विक्रीस काढलें असून मे. कर्णिक अ‍ॅन्ड भावे लि. हे या कंपनीचे मॅनेजिंग एजंट्स् आहेत.

सॅन फ्रॅन्सिस्को येथील आंतरराष्ट्रीय कामगार परिषदेवर उद्योगपतींचे प्रतिनिधी म्हणून **शेठ रतनचंद हिराचंद** यांची निवड झाली आहे.

**असोसिएटेड शुगरकेन प्रॉडक्ट्स् लि.** ( कुंटे चौक, पुणें २ ) यांनीं आधुनिक यंत्रसामुग्रीनें गूळ वा खांडसारी साखर करण्याचा उपक्रम या हंगामांत केला.

**सेंट्रल म्युच्युअल लाईफ अ‍ॅशुअरन्स कं. लि.** नें ( लालगीर चेंबर्स, फोर्ट, मुंबई ) १९४७ सालांत सुमारे साडेपांच लाखांचे काम केले असून तिच्या खर्चाचे प्रमाण १२॥ टक्के आहे. मरहूम डायरेक्टर नूर महंमद चीनॉय यांच्या जागीं सॉलिसिटर श्री. शांतिलाल शहा, एम्. एल. सी. यांची चेअरमन म्हणून निवड झाली.

वैद्यक विषयावर सर्व प्रकाशित पुस्तकें एका ठिकाणीं मिळण्यासाठीं 'आयुर्वेद सेवा संघ' (नाशिक) यांनीं "**वैद्यक ग्रंथ भांडार**" उघडले असून त्यामुळें जिज्ञासूंची मोठी सोय झाली आहे. या क्षेत्रांतील सुमारें सव्वाशें शास्त्रीय पुस्तकें येथें मिळूं शकतात.

दैनंदिन उपयोगाचे पदार्थ करण्यासाठीं "**हिंद कमर्शिअल सिंडिकेट लि.**" (लक्ष्मीपुरी, कोल्हापूर) ही कंपनी काम करीत असून तिचें भांडवल एक लक्ष रु. चे आहे.

श्री. बी. एम. कारेकर यांनी मुंबई येथील ट्रायम्फ पिक्चर्स लि. च्या व्यवस्थेंतून निवृत्त झाल्यावर या वर्षाच्या सुरवातीस **सूव्ही इस्टेट्स** नांवांची स्वतंत्र चित्रवितरण संस्था ९५ क्वीन्स रोड, मुंबई १ येथें स्थापन केली. "रिपाब्लिक" सारख्या प्रसिद्ध कंपनीचे १६ साहसी चित्रपट मुंबईप्रांतासाठीं मिळवून या संस्थेनें चांगला लौकिक मिळविला. हिंदी व मराठी चित्रपट प्रकाशन ही या संस्थेची आगामी योजना आहे.

सुप्रसिद्ध महाराष्ट्रीय **चित्रपटतारका रत्नमाला** या प्रकाश पिक्चर्सच्या "उषा–हरण" या बोलपटांत नायिकेची भूमिका करीत आहेत. बॉंबे टॉकीजच्या "रजनी" या आगामी सामाजिक चित्रपटांत काम करण्यासाठींहि त्यांचा करार झाला आहे.

आहार, आरोग्य, पाकशास्त्र इ. विषयांना वाहिलेल्या **"आहार" मासिकाचा** (११७ गिरगांव रोड, मुंबई) पहिला वाढदिवस नुकताच श्री. स्वामी कुवलयानंद यांच्या अध्यक्षतेखालीं साजरा झाला. शास्त्रीय विषय सुबोध भाषेत मांडण्याचा उपयुक्त उपक्रम मासिकाचे संचालक श्री. काकासाहेब तांबे यांनीं यशस्वी केला असून त्यांनीं हें प्रकाशन स्वार्थत्यागपूर्वक चालविलें आहे. समारंभाचें वेळीं झालेल्या डॉ. म्हसकर प्रभृतिसारख्या नामांकित वक्त्यांच्या भाषणावरून त्यांच्या प्रयत्नांचें चीज होईल अशी अपेक्षा आहे.

**पर्सनल प्रेस सर्व्हिसनें** मुंबईत आंग्रेवाडी— विठ्ठल भाई पटेल रोड–येथें आपली शाखा उघडली असून तीवर पॅरेमाउंट पाब्लिसिटी सिंडिकेट लि. चे एक डायरेक्टर श्री. वि. ज. घारपुरे, एम्. ए. एल्-एल् बी. हायकोर्ट वकील यांची देखरेख राहील.

मिरज येथें स्थापना झालेल्या—**दि डेक्कन प्रिन्टर्स लि.**—या छापखान्यानें आधुनिक यंत्रसामुग्री आणविली आहे. या कंपनीला पांच वर्षे प्राप्तीवरील कराची फक्त एक चतुर्थांश आकारणी करावी अशी सरकारी सवलत मिळाली असून मराठे मिल्स्चे मालक श्री. गोविंदराव मराठे, बी. एस्. सी. हे कंपनीच्या संचालक मंडळाचे अध्यक्ष आहेत.

मराठा चेंबर ऑफ कॉमर्सनें या वर्षीचीं—**पारखे औद्योगिक मान पारितोषिकें** (१) मे. जयंत आणि कं. मुंबई, (२) मे. जेकॉप इंजिनिअरिंग वर्क्स लि. पुणें २, व (३) मे. ओरिएन्टल इंडस्ट्रीज लि. पुणें २ या कारखान्यांना दिलीं.

**हिंदुस्थानांत मोटारींचें उत्पादन** व्हावें याकडे सरकारनें लक्ष दिलें असून दोन मोठ्या कारखान्यासाठीं यंत्रसामुग्री आणविण्याची व्यवस्था झाली आहे. या कारखान्यांतून सालिना ३०,००० लॉरीज बाहेर पडतील.

**अशोक पिक्चर्स** (पुणें) या नांवाची बोलपट संस्था दिग्दर्शक श्री. अच्युतराव रानडे प्रभृतींनीं स्थापन केली आहे. "जागा भाड्यानें देणें आहे" हा चित्रपट ते हातीं घेणार आहेत.

**नवभारत प्रकाशन लि.** (मिरज) नावांची दहा लक्ष रु. अधिकृत भांडवलाची कंपनी मुद्रण प्रकाशनाचें उद्योगासाठीं स्थापन झाली असून श्री. बा. वि. शिखरे, कंपनीचे मॅनेजिंग डायरेक्टर आहेत. बॅ. आप्पासाहेब पंत, श्री. शंकरराव देव प्रभृति श्रीमंत पुढारी कंपनीच्या संचालक मंडळांत आहेत.

---








## जाहिरातीचे दर

| | सबंध पान | अर्धे पान | पाव पान |
|---|---|---|---|
| एक वेळ | ७५ | ५० | ३५ |
| तीन वेळा | ७० प्रत्येक खेपेस | ४५ प्रत्येक खेपेस | ३० प्रत्येक खेपेस |
| सहा वेळा | ६५ ,, | ४० ,, | २५ |
| बारा वेळा | ६० ,, | ३५ ,, | २० ,, |

पाव पानापेक्षां कमी जाहिरात स्वीकारली जात नाहीं.

| | | |
|---|---|---|
| कव्हर पान नं. ४ | प्रत्येक वेळेस | १५० रुपये |
| कव्हर पान नं. २ व ३ | ,, ,, | १२० ,, |

(१) सर्व जाहिराती ‘जाहिराती व जाहिरातदार’ या सदरांत छापल्या जातात.

(२) शक्य असेल त्या वेळेस जाहिरातदारांचा थोडक्यांत परिचय देण्याची पद्धत स्वीकारलेली आहे.

(३) एका पानांत दोन कॉलम्स असतात.

(४) पानाचा आकार ८॥''×५॥''

व्यवस्थापक
‘नवभारत’
२१९ शिवाजीनगर, पुणें ५.







नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

# 'नवभारता'चें स्वागत

" वाङ्मयीन दर्जा व विषयांचें वैविध्य हीं इतर बऱ्याच सद्यःकालीन मासिकांत न आढळणारीं वैशिष्ट्यें प्रामुख्यानें डोळ्यांत भरतात. ध्येयवादित्व शंकररावजी, जावडेकर व भागवत या नांवांशीं निगडितच आहे, तेव्हां त्यांचा उल्लेख करण्याची आवश्यकता नाहीं."

—ना. बा. गं. खेर, मुंबई ( १६-१०-४७ )

" थोर उद्दिष्टाला साजेशी कामगिरी सतत करीत राहण्यास समर्थ अशी संपादक मंडळी 'नवभारता' स लाभलेली आहे...... नामवंत विद्वान् लेखकांचें साहाय्य म्हणजे नवभारताच्या यशाची एक प्रकारची हमीच होय."

—नवा काळ, मुंबई ( २२-१०-४७ )

" मागें श्री. जांभेकर यांनीं 'लोकशिक्षण' नांवाचें असेंच एक मासिक काढलें होतें. तें त्यांनीं बरेंच ध्ययनिष्ठेनें व पदरास खार लावून चालविलें. पण तें थोडें रूक्ष होतें. लोकशिक्षणाचा उच्च दर्जा 'नवभारतां' त असूनहि त्याचा रूक्षपणा नाहीं हा याचा विशेष आहे. ......

—नवशक्ति, मुंबई ( २१-११-४७ )

" It is a forum where any one may come and air his views on any question concerning the social well being and cultural progress of our people. We heartily welcome this new magazine."......

**Bharat-Jyoti**, Bombay, (7-12-47)

" आजवर या मासिकाचे सहा अंक प्रसिद्ध झाले. या कालांत महाराष्ट्रांत एकदम बरींच मासिकें सुरू झालीं आहेत आणि प्रत्येकाचें कांहीं तरी वैशिष्ट्य आहेच. पण 'नवभारता'चें जें वैशिष्ट्य आहे तें उल्लेखनीय आहे. प्रचलित राजकीय, आर्थिक, सामाजिक, ऐतिहासिक, वाङ्मयात्मक वगैरे सर्व विषयांची तात्त्विक व शास्त्रीय बाजू या मासिकांत अधिकारी लेखकांकडून लिहिलेली वाचावयास मिळते."...

—लोकमान्य, मुंबई ( १०-३-४८ )

" हें मासिक महाराष्ट्रांतील थोर विद्वानांच्या विद्वत्तेचें व व्यासंगाचें आल्हाददायक नवनीत आहे असें म्हणणें बिलकुल अतिशयोक्तीचें नाहीं. ... ... ... आम्हांस तर असें वाटतें कीं ज्यांच्या वाचनांत हें मासिक नाहीं तो काळाच्या मागें पडल्यावांचून रहाणार नाहीं. ... ... या मासिकांतील वाङ्मयाचें अन्न थोडें जड वाटलें तरी पौष्टिक आहे. सबंध महिनाभर एकएका अंकांतील लेख सावकाशपणें चर्वण करावें अशा योग्यतेचें हें मासिक आहे." ......

—स्वतंत्र भारत, धुळें (२५-५-४८)


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास


नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष